

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन



अनुक्रमणिका







# दीपावली

साहित्य • कला • संगम

## श्रेयनामावलि

*कलाकृति :* **महिषासुरमर्दिनी दुर्गा.**

*कथा :*

- **रॉय किणीकर**—रंगीत पाळणा. ( एकांकिका )
- **वि. सो. गुर्जर**—प्युरिटन्. • **गंगाधर गांगुली**—सांपळा.
- **बाळ गाडगीळ**—आमचें स्टीलचें कपाट.

*काव्य :*

- **शांता ज. शेळके** • **राजा बढे** • **पद्मा लोकूर.**

*ललित लेख :*

- **गोपाळकृष्ण भोबे**—दुर्गतिनाशिनी दुर्गा.
- **सौ. वसुंधरा पटवर्धन**—कावळे. • **भय्यासाहेब ओंकार**—चीनची चित्रकला.

*रहस्यमय सत्यकथा :*

- **चंद्रसेन**—देवकी.

*प्रवास वर्णन :*

- **अनंत काणेकर**—गंधद्वीप—एक अद्भुतरम्य प्रदेश.

*वैचारिक लेख :*

- **जुन्यांतलें सोनें** —नाट्यछटाकार दिवाकर. • **दीपमाळ**—पिनाकि, विष्णुशर्मा, गोपालन् • **चंद्राला गवसणी**—रा. वि. सोवनी.



*सदरें :*

- घातली ही पाणपोई—**मो. ग. रांगणेकर.** • भाषा मराठीच—**बाणकोटी भाषा.**
- मूर्ति लहान कीर्ति थोर—**सेफ्टीपिन, शिलाईचें मशीन, फौन्टन पेन.**


वर्ष १५ वें
ऑक्टोबर १९५९

**दीपावली**—मासिक दर महिन्याच्या एक तारखेस प्रसिद्ध होतें.
संपादक-मुद्रक-प्रकाशक : श्री. **दीनानाथ दलाल.** दलाल आर्ट स्टुडियो ४०–४२ केनेडी ब्रिज मुंबई नं. ४. प्रत्येक प्रतीस किंमत रु. १. अधिक रजिस्टर पोस्ट ५० नये पैसे. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२. या अंकांत प्रसिद्ध झालेली मतें चालकांची अधिकृत मतें असतातच असें नाहीं. या मासिकांतील प्रकाशित चित्रें व लेख यांवरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन.



# चंद्राला गवसणी

कवींच्या कल्पना-साम्राज्याचा सम्राट, प्रेमिकांचा आधार, निशेचा नाथ, आणि शास्त्रज्ञांच्या भरारीमधील एक टप्पा असलेला हा चंद्र आतां मानवाच्या हाताशीं आला आहे. दि. १४ सप्टेंबर १९५९ रोजीं पहाटें अडीच वाजतां रशियन शास्त्रज्ञांनी पाठविलेला अग्निबाण चंद्रावर जाऊन पोहोंचला. त्यानंतर एकच दिवसाने म्हणजे दि. १५ सप्टेंबर १९५९ रोजी राष्ट्रपति राजेंद्रप्रसाद ह्यांचे हस्ते दूरचित्रवाणीच्या ( Television ) प्रायोगिक केंद्राचें उद्‌घाटन झाले. भारतांत दूरचित्रवाणी आणखी एक दोन पंचवार्षिक योजनांच्या काळांत घरोघरी दिसूं लागेल याबद्दल आपल्याला आनंद होत आहे. पण रशियन शास्त्रज्ञांनी पाठविलेला अग्निबाण पाहून आपण जगाच्या खरोखरीच किती मागे आहोत ह्याची जाणीव मनाला होते.

आजपर्यंत मानव चंद्राच्या सौंदर्याचें आकंठपान करीत आला आहे. एकेकाळीं हा चंद्र मिळविणें ही एक असाध्य गोष्ट होती. परंतु मानवानें आपल्या बुद्धीच्या जोरावर चंद्रावर जाण्याचा पहिला टप्पा गांठला. आतां चंद्रावर जाणे ही गोष्ट साध्य होण्यास फार काल लागणार नाहीं.

चंद्रावर गेलेल्या अग्निबाणाची कथा मनोरंजक आहे. ती थोडक्यांत तुम्हाला सांगतो. खरं म्हणजे अग्निबाण ही चीज कांहीं नव्यानें तयार झालेली नाहीं.

पहिला अग्निबाण सातशे वर्षांपूर्वी प्रथम चीनमध्यें तयार करण्यांत आला. ह्या अग्निबाणांचा उपयोग त्यावेळीं लढाईंत करण्यांत येत असे. त्यानंतर त्यांत सुधारणा होत गेली. १८ व्या शतकांत भारतातील एका छोट्या राज्याच्या सैनिकांनी ह्या अग्निबाणांचा उपयोग करून ब्रिटिश फौजा परतवून लावल्या होत्या. दुसरे महायुद्ध सुरू होण्यापूर्वी जर्मन शास्त्रज्ञ अग्निबाणांचा उपयोग अवकाशांतील प्रवासासाठीं कसा करता येईल ह्याचा विचार करीत होते. परंतु युद्ध सुरू झाल्यामुळें तो विचार त्यांना सोडून द्यावा लागला. पुढें ह्याच अग्निबाणाचा उपयोग V2 अग्न्यास्त्रामध्यें करून इंग्लंडमधल्या लोकांना बेजार करून सोडलें होतें.

अग्निबाणांच्या या इतिहासांत दोन व्यक्तींचा प्रामुख्यानें उल्लेख करावा लागेल. टिसिओल्कोव्हास्की ह्या रशियन शिक्षकानें प्रथम अग्निबाणांचा उपयोग अवकाशांतील प्रवासास योग्य आहे असे सिद्ध करून दाखविले. १८९८ सालीं त्यानें असे लिहून ठेवले आहे कीं "अग्निबाणांचा उपयोग करून आपल्याला पृथ्वीबाहेर प्रवास करता येईल. व ह्या अग्निबाणांत द्रव इंधन वापरण्यात यावें" त्यावेळीं हवेंतील प्रवास हे एक स्वप्नच होते. अमेरिकेंतील रॉबर्ट गोडार्ड ह्या दुसऱ्या व्यक्तीनें टिसिओल्कोव्हास्कींची कल्पना मूर्त स्वरूपात आणून

( पान ६ वर पहा )



भारतीय संस्कृतीचीं प्रतीकें : ८ **महिषासुरमर्दिनी दुर्गा.**

दीप्तक्षुद्वेगयोगाद्वदनलहलहल्लंबजिव्हाग्रलीढं–
ब्रह्माण्डक्षौद्रबिंदुप्रबलतरभवज्जाठराग्निस्फुलिंगाम्
कालीं कंकालशेषामतुलगलचलन्मुण्डमालाकरालाम्
गुञ्जासंवादिनेत्रामजिननिवसनां नौमि पाशासिहस्ताम्

उदरीं भडके क्षुधा म्हणुनिया ब्रह्माण्डहि जी घेत चाटुनी
लवलवणाऱ्या लांब जिभेनें–तरिही प्रदीप्तच हो जठराग्नि
अस्थिशेष तनु, चर्मवसन वरि रुळती कंठीं रुण्डमालिका
खड्गपाशधर रक्तलोचना सभय वंदितों देवि कालिका

— शान्ता ज. शेळके

( पृष्ठ ४ वरून )

दाखविली. १९३५ मध्यें गोडार्डचा अग्निबाण आकाशात ७५०० फूट उंच गेला. तेव्हांपासून अवकाशांतील प्रवासासंबंधीच्या पुसट कल्पना शास्त्रज्ञांना येऊं लागल्या व आपण एक दिवस चंद्रावर जाऊं असें तें म्हणूं लागले. अर्थात नंतर सर्व जगच युद्धाच्या महत्वाच्या कामांत गढल्यामुळें ही गोष्ट लोक विसरून गेले.

परंतु नंतर एक दिवस अकस्मात साऱ्या जगाला धक्का देणारी गोष्ट घडली. ऑक्टोबर १९५७ मध्यें रशियन शास्त्रज्ञांनीं १८४ पौंडांचा पहिला कृत्रिम चंद्र स्पुटनिकच्या स्वरुपांत आकाशांत भिरकावला. हा चंद्र पृथ्वीभोंवती गुंजारव करूं लागला. पाठोपाठ त्याहून मोठे स्पुटनिक आणि तेही लायका कुत्रीसहित आकाशांत विराजमान झाले. तिसरे स्पुटनिक तर जवळ जवळ तीन हजार पौंड वजनाचे होतें. ह्या घटना इतक्या विलक्षण वेगाने घडल्या कीं सामान्य माणसाला काय झाले हेच कळले नाहीं.

बालचंद्र पाठविण्याचा एक उद्देश असा होता कीं, पृथ्वीभोंवताली असलेल्या पोकळीची थोडीशी कल्पना यावी. त्यामुळें पुढील प्रवासाचेवेळीं योग्य ती दक्षता घेता येईल. बालचंद्र पाठविण्यासाठीं अग्निबाणांचा उपयोग करतात. एकावर एक असे तीन चार अग्निबाण एकत्र बांधतात. शेवटीं टोंकावर चंद्र बसवितात. पहिल्या अग्निबाणाची गति दुसऱ्या बाणाला दुसऱ्याची तिसऱ्याला असे होत शेवटचा अग्निबाण प्रचंड वेगाने चंद्राला घेऊन अवकाशांत जातो. त्या अग्निबाणांतील इंधन संपले कीं तो बाण पडून जातो परंतु चंद्र भ्रमण करीत राहातो.

पृथ्वीच्या गुरुत्वाकर्षणाच्या कक्षेबाहेर पडल्याखेरीज अग्निबाण अनंत अवकाशात जाणे शक्य नाहीं. त्यासाठीं हा बाण ताशी २५,००० मैल वेगाने गेला पाहिजे. पण एवढा वेग येण्यासाठीं दोन किंवा तीन टप्प्यांचे अग्निबाण पुरणार नाहींत. म्हणून एकाच वेळीं २।३ अग्निबाण न बसविता बरेच अग्निबाण एकावर एक बांधून पाठविता आले पाहिजेत. अर्थात ही गोष्ट सोपी नव्हे. परंतु रशियन लोकांनीं ही गोष्टहि साध्य करून दाखविली. १३०० पौंडाचा अमेरिकन चंद्र डिसंकव्हरर आकाशांत जाण्यापूर्वीच ह्या वर्षीच्या जानेवारीत रशियन मेचटा ( वजन ३४२५ पौंड ) चंद्राच्या दिशेने निघाली सुद्धां ! चंद्रावर न जाता हा अग्निबाण त्याच्या जवळून पांच हजार मैल अंतरावरून गेला, व सूर्य मालेंतील एक ग्रह बनला. ही एक आश्चर्यकारक गोष्ट घडली. कारण ह्याचा अर्थ असा कीं ताशीं २५००० मैल वेगाने जाणारा अग्निबाण तयार करता येतो. अमेरिकन शास्त्रज्ञानीहि असाच एक प्रयत्न केला व तोहि यशस्वी झाला. पण त्यांनीं पाठविलेला अग्निबाण लहान होता.

शेवटीं १४ सप्टेंबरला रशियन अग्निबाण चंद्रावर गेला. हा बाण पाठविल्यावर रशियन शास्त्रज्ञांनी त्याची माहिती इतर शास्त्रज्ञांना दिली. त्यांनी सांगितल्या बरहुकुम तो अग्निबाण प्रवास करीत होता. त्यांतून पाठविलेले संदेश बरोबर पकडता येत होते. शास्त्रज्ञांच्या अचूकतेचे कौतुक करावे तेवढे थोडे आहे. ह्या दोन लाख चाळीस हजार मैल प्रवासाचें त्यांचें वेळापत्रक फक्त दीड मिनिटापेक्षांहि कमी वेळाने चुकले. येथें आपल्याला लोकल गाड्यांचे वेळापत्रक साधता येत नाहीं, तेथें एवढ्या प्रचंड प्रवासांत दीड मिनिटांचा उशीर कांहींच नव्हे.

ह्या अग्निबाणाचें महत्व काय ? मनुष्यांचा प्रयत्न प्रथम चंद्रावर जाण्याचा आहे. अर्थात त्याचा उद्देश इतर ग्रहांवर जाण्याचा आहे. परंतु हा विचार टप्याटप्यांनी अमलांत येईल. मनुष्याच्या विचाराला कोणताच बंध नसल्यामुळें त्याने अनंतांत प्रवास करण्याचा विचार करावा हे रास्तच आहे.

आज जगांत रशिया व अमेरिका ही दोन महान राष्ट्रेंच अशा प्रकारचें प्रयत्न करूं शकतील. त्यामुळें ह्या दोन राष्ट्रांत चंद्रावर प्रथम कोण जातो ह्याची चढाओढ लागली आहे. रशियन लोक हे आघाडीवर आहेत हे निश्चित व विचारवंत अमेरिकन शास्त्रज्ञांची अशी खात्री आहे कीं चंद्रावर प्रथम रशियन लोकच जातील. परंतु सत्य हे कटु असतें. व त्यामुळें अमेरिकन माणसाला ही गोष्ट नेहमी खटकते. रशियन शास्त्रज्ञ ज्याअर्थी इतक्या अचुक लक्ष्यवेध करतात त्याअर्थी त्यांच्याजवळ ज्ञान अधिक आहे ह्यांत शंका नाहीं. अग्निबाणांत वापरण्यांत येणारे एक खास इंधन त्यांच्याजवळ असावे असे मानले जाते.

ह्यानंतरचा प्रश्न असा कीं चंद्रावर जाऊन काय मिळेल ? शास्त्रज्ञांना कांहीं विशिष्ट माहिती मिळवावयाची आहे. उदा०—चंद्रावर ज्वालामुखीचे स्फोट होतात कां ? चंद्राला चुंबकीय क्षेत्र आहे का ? चंद्रावर पृथ्वीप्रमाणेंच पदार्थ आहेत का ? चंद्रावरील धुळीमध्यें जीवनाच्या उत्पत्तीचे रहस्य दडविले आहे काय ? चंद्रावर मानवाची वस्ती होईल काय ? चंद्रावरचे वातावरण कसें आहे ? इत्यादि इत्यादि. तेथे प्रथम कोण जातो ह्यापेक्षां वरील प्रश्नांची उत्तरे मिळणे हे शास्त्रज्ञांना अधिक महत्त्वाचे वाटत आहे.

अमेरिकन व रशियन विचार सरणींत एक मूलभूत फरक आहे. अमेरिकन लोक म्हणतात कीं, "आम्हीं चंद्रावर जाणार आहोंत. पण त्यासाठीं आम्ही मोठी, आरामशीर अशी वहानें तयार करूं व मग जाऊं. मग त्यासाठीं वेळ लागला तरी चालेल. रशियन लोक म्हणतात कीं, "आम्हीं प्रथम चंद्रावर जाऊं व नंतर आलिशान प्रवासाबद्दल विचार करूं." रशियन शास्त्रज्ञ थोड्याच कालांत माणसाला चंद्रावर पाठवून परत आणतील. त्यांना चंद्रावर राज्य प्रस्थापित करावयाचें नाहीं. किंवा चंद्राचा ताबा घेऊन तेथून पृथ्वीवर नियंत्रणहि ठेवावयाचें नाहीं. आपण भारतांतील लोक ही गोष्ट वाचून विसरून जातो परंतु असे विसरून चालणार नाहीं. आपणहि जागे होऊन त्या दिशेनें प्रयत्न करणें जरूर आहे.

— प्रा. रा. वि. सोवनी, M. SC.







# दीपावली

भाद्रपद शके १८८१ ऑक्टोबर १९५९

## दुर्गतिनाशिनी दुर्गा

नैमिषारण्य हें सर्व तीर्थांत उत्तम आणि सर्व क्षेत्रांत श्रेष्ठ असें क्षेत्र. शौनकादि तपस्वी मुनीनीं जगत्कल्याणार्थ तिथें एक महायज्ञ आरंभला होता, दीर्घ-कालपर्यंत चालण्याऱ्या या यागासाठीं भरतखंडांतले सर्व तपोनिष्ठ कर्म-निष्ठ ऋषि तिथें एकत्रित झाले होते. आपल्या तपःसामर्थ्यानें त्रिकाल-ज्ञत्व पावलेल्या या महात्म्यांच्या मेळाव्याचें दर्शन घडावें म्हणून महातपस्वी वेदव्यासशिष्य लोमेश मुनींचें तिथें आगमन झालें. त्यांना पाहून सर्व ऋषिगणांत परमोल्हास निर्माण झाला. यथासांग स्वागता-नंतर आणि आतिथ्यानंतर ऋषिजनांनी विस्तारपूर्वक शिवधर्माचें विवेचन करण्यासाठीं लोमेशांना प्रार्थना केली. लोमेशांनीं ती मानली, आणि शिवमहात्म्याचें वर्णन यथासांग केलें. लोमेश कथा सांगत असतानांच मध्येंच ऋषिगण आपलें शंकानिरसन होण्याकरितां निर-निराळे प्रश्न विचारीत. आणि आपसांतच त्यांचें शंका निरसन होई. एकानें प्रश्न विचारला होता--हे भगवन्, दुर्गा ही कोण आणि तिचा अवतार कशासाठीं झाला ? महामुनि म्हणाले--पूर्वी रुरू दैत्याचा पुत्र दुर्ग यानें घोर तपश्चर्या करून भगवान शिवाला प्रसन्न करून घेतलें. आणि पुरुषमात्राकडून आपण अवध्य व्हावें असें वरदान मागून घेतलें. भोलेनाथ तथास्तुः म्हणून अंतर्धान पावले. या दुर्गदैत्यानें आपल्या बाहुबलावर त्रैलोक्याचें राज्य जिंकलें, आणि अत्यंत उन्मत्त होऊन देव ब्राह्मणांच्या छळवादाला सुरवात केली. वेदाध्ययन थांबलें, यज्ञ शाळांचा विध्वंस झाला. देव, ब्राह्मण दीन, हीन, अनाथ झाले. आपद्ग्रस्त असे हे सर्व देव ब्राह्मण, भगवान महेश्वराला शरणे गेले. नीलकंठाना आपण दिलेल्या वराची आठवण झाली. आणि त्यानी भगवतीकडे एक आदेशपूर्ण दृष्टिक्षेप टाकला. भवानीनें त्याचक्षणीं शरणार्थींना अभयदान दिलें. तिनें विक्राळरुद्र-शक्ति धारण केली आणि कालरात्रीला आवाहन करून ती महाकाली-रूप झाली. दुर्गदैत्याच्या नगरांत जाऊन तिनें त्याला युद्धाचें आव्हान दिलें. दुर्गाचें आणि महांकालीचें घनघोर असें युद्ध झालें. देवीला पराभूत करायला दैत्यराजानें अनेक मायावी रूपें धारण केलीं; परंतु जगदम्बेनें आकाशांत उड्डाण केलें. अंतराळांत आपण तिला सहज पराभूत करूं शकूं म्हणून दुर्गदैत्यही तिच्या मागोमाग उडाला. देवीला हेंच पाहिजे होतें. तिनें त्रिशुळाच्या प्रहारानें त्याची छाती फोडली, आणि त्याला अलगद भूलोकावर ढकलून दिला. त्या पर्वत-प्राय असुराचे राई राई एवढे तुकडे झाले. दैत्यवधानंतर देवतानीं दुदुंभी वाजवून आनंद प्रदर्शित केला, आणि सच्चिदानंद प्रणवरुपिणी आदिमायेचें स्तवन केलें. कोणाविष्ट देवी शांत झाली. दुर्गदैत्याचा वध केला म्हणून ती दुर्गा या नावानें प्रसिद्ध झाली.

दुर्गदैत्याचा वध झाला आणि देवी अंतर्धान पावली; परंतु एवढ्यानेंच तिचें कार्य संपलें नाहीं. दुर्गाच्या वंशांतील महिषानेंही विकट तपःसाधना केली आणि महादेवानां प्रसन्न करून घेतलें. त्यांच्या वरप्रभावानें तोही मातला ! सर्व देवानां त्याने सळो की पळो करून सोडलें. तेंव्हां ब्रह्मा, विष्णू, महेशानीं दुर्गेची प्रार्थना केली. देवी प्रगट झाली तेव्हां तिच्या अष्टभुजा निःशस्त्र होत्या. त्याचवेळीं ब्रह्मा, विष्णू, महेशांच्या मुखांतून ज्वाळा निघाल्या आणि आदिमायेच्या शरिरांत विलीन झाल्या. देवीचें शरीर तेजःपुंज झालें. वैकुंठानें तिच्या एका हातांत सुदर्शन दिलें, लगेच शिवानीहि दुसऱ्या हातांत त्रिशूळ दिला. याचप्रमाणें ब्रह्मदेव, इंद्र, कुबेर, अग्नि, विश्वकर्मा, वरुण, यानीं तिच्या प्रत्येक हातांत शस्त्र दिलें.

सायुध अशी देवी विंध्य पर्वताच्या दिशेनें चालत गेली. महिषानें ज्यावेळीं तिला पाहिली त्यावेळीं अचकट विचकट शब्द उच्चारून त्यानें तिला पकडायचा प्रयत्न केला; परंतु त्याला हुलकावण्या देत चकवायचा प्रयत्न देवी करूं लागली. दैत्यानें निरनिराळीं रूपें धारण केलीं. शेवटीं तो युद्धास प्रवृत्त झाला. नऊ रात्री हें युद्ध चालू होतें.









अनुक्रमणिका

अखेर दुर्गेनें आपल्या त्रिशुळानें महिषावर प्रहार करून त्याला ठार मारलें. महिषासुराच्या वधामुळें देवीला महिषासुरमर्दिनी असें नांव पडलें. देवांनीं दुर्गेची स्तुति करून नऊ रात्री मोठा उत्सव केला. त्या पासून ही नवरात्रांची प्रथा सुरू झाली.

दोन्हीं वेळां केवळ आपणामुळें जगदम्बेला श्रम झाले, यामुळें तरी पस्तावून महादेवानीं गप्प बसावें; परंतु नाहीं, भोळ्या सांबानें कठीण तपस्या करणाऱ्या शुंभ-निशुंभ दैत्यांना असाच एक वेफाट वर दिला. आणि ते प्रबळ झाले. कुणालाही ते आटोपेनात. तेव्हां चामुंडा देवीच्या रूपानें दुर्गा अवतरली. आणि तिनें या दोन्ही असुरांचा संहार केला. चामुंडा दशभुजा आहे. ती सिंहावर आरूढ झालेली अशी आहे. मुगुटधारी असून अंगावर रत्नजडीत वस्त्रें आहेत.

'काळ' या नांवाचा एक राक्षस असाच मदोन्मत्त झाला. आर्यांनां आणि अनार्यांनां–मिळेल त्याला भक्षण करायचा त्यानें सपाटा चालवला होता. त्यावेळीं दुर्गेनें कालीचें रूप घेतलें. त्या वेळच्या तिच्या रूपानें वर्णन काय करावें. ती अर्धनग्न होती. कमरेल्या तोडलेल्या हातांच्या माळेचा पट्टा घातला होता. गळ्यांत नरमुंडांची माळ होती. आपल्या काळ्याकभिन्न शरिरावर तिनें रक्ताचे पट्टे ओढलेले होते. चतुर्भुज अशा या मूर्तिच्या एका हातांत प्रचंड खड्ग होतें. काळाच्या बाजूनें रक्तवीर नांवाचा एक राक्षस तिच्याकडे लढूं लागला. तेव्हां आपल्या खड्गानें तिनें त्याचें डोकें कापून, त्या रक्तवीराचें रक्त ती घटघटा प्याली. नंतर तिनें काळालाहि ठार केलें. या विजयोन्मादाच्या भरांत ती थै थै नाचू लागली. तिच्या त्या तांडव नृत्यानें पृथ्वी थरथरां कापूं लागली. ती कशाच रीतिनें आवरेना तेव्हां तिच्या पायाखालीं भगवान शंकरानीं आपला देह अंथरला. बेभान नाचणाऱ्या कालीनें आपल्या पायाखालीं येणाऱ्या शंकरानां पाहिलें. अचानक तिची नजर गेली. ती लाजली आणि स्त्री सुलभ वृत्तीनें तिनें आपली जीभ बाहेरें काढली. देवीचें तेंच रूप अधिक प्रसिद्ध आहे.

महामुनि लोमेशानीं सांगितलेल्या या कथा स्कंदानी अगस्तिस सांगितल्या. त्या स्कंदपुराण म्हणून लौकिक मान्य झाल्या. या स्कंद पुराणाचे ८११०० श्लोक आहेत. आणि त्यांत दुर्गेसंबंधीं अनेक कथा आढळतात. स्कंदपुराणाच्या ६ संहिता आणि ५० निरनिराळे खंड आहेत. रेवा खंडांत निराळ्या, काशी खंडांत निराळ्या तसेंच महेश्वर, ब्रह्म, प्रभास, अवन्ती, नागर आदि आदि खंडांत जगदम्बा दुर्गेच्या नांवावर शेंकडों कथा आढळतील. तसेंच दुर्गापूजेचे प्रकार देखील भारतांतील प्रत्येक प्रांतांत वेगवेगळ्या तऱ्हेचे आहेत. गुजरातेंत-पांढऱ्या रंगानें भिंत सारवून त्यावर शेंदूराचा त्रिशूळ काढतात आणि त्याच्या पुढ्यांत मातीचा ढीग रचून त्यावर धान्य पेरतात. एका छिद्रांकित मातीच्या कलशांत दिवा ठेवून तो त्या त्रिशूळासमोर ठेवला जातो आणि नऊ रात्रीपर्यंत अखंडितपणें तो पेटत राहातो. नवव्या दिवशीं नृत्यगायनादिप्रकारांसह उत्सवाचें विसर्जन होते ! महाराष्ट्रांत मूर्तिऐवजीं कलशावर देवीची स्थापना करतात. कलशासभोंवती धान्यहि पेरण्याची पद्धत आहे. भवानीआई, अंबाबाई आदि देवींचे भक्त या दिवसांत मशाली घेऊन घरोघरीं कपडे गोळा करीत फिरत असलेले सर्व परिचित आहेत. रजपूत लोकांत तोफेवर कुंकवाचा त्रिशूळ काढून त्याची पूजा नवरात्रांत करण्याची पद्धत आहे. दक्षिणेकडील देवळांतहि मोठ्या प्रमाणावर नवरात्रांचा उत्सव होतो. गोमंतकांत विशेषता 'अंत्रुज महालांत' पत्र, पुष्प, फल, तोयाची समृद्धि असल्यानें तिथें या उत्सवाला अधिक रंग येतो. उत्सवमूर्ति आरतीच्या वेळीं मखरांत बसवून त्या मखराला झोके दिले जातात. समोर सुस्वर वाद्यांचा गजर एकसारखा चालत असतो. आणि त्या तालावर तें मखर हालवलें जातें. भारतांतील इतर कुठल्याही प्रांतापेक्षां बंगालांत दुर्गापूजा हा कुलाचार असल्यानें तिथें या महोत्सवाचें महत्व फार आहे. देवीच्या मूर्तिबरोबरच घट स्थापना करून वाद्य, नृत्य, गायन, लळितादि कार्यक्रमाच्या जल्लोशा-बरोबरच दिपोत्सवही केला जातो. 'कालीमातेचा विजय असो.' अशा घोषानें कलकत्ता नगरी दुमदुमून जाते. शेवटच्या तीन रात्री महापूजेच्या असतात. उच्च-नीचतेच्या, किंवा कसल्याहि हीन भावनांचा लेश या काळांत तिथें मानला जात नाहीं. स्त्री-पुरुष राव-रंक सगळेच आपण एकाच कालीमातेचीं लेकरें समजून देवीसमोर शिर नमवतात. दुर्गेच्या या पूजेंत पशुबलीचे प्रकार मात्र भारतांत सर्व ठिकाणीं अजून आहेत. नवरात्र संपतें आणि दसरा उदय पावतो. वास्तविक दसरा हा कृषि विषयक सण आहे. आपल्या कृषिप्रधान देशांत नवधान्याच्या उत्सवाप्रीत्यर्थ तो साजरा केला जातो असा उल्लेख कांहीं ग्रंथांत सांपडतो. स्कंद पुराणांत या संबंधींची एक कथा जोडलेली आहे. वरतंतू ऋषीच्या कौत्स नांवाच्या शिष्यानें विद्या विभूषित झाल्यावर आपल्या गुरूला गुरुदक्षिणा मागण्याबद्दल अत्याग्रह केला. वरतंतूनीं चौदा कोटी सुवर्णमुद्रा मागितल्या. कौत्सानें तें मान्य करून तो दानशूर आणि उदार अशा रघुराजाकडे गेला. याच वेळीं रघुराजा विश्वजित यज्ञ करून निष्कांचन झालेला होता; परंतु कांहीं झालें तरी याचकाची इच्छा पुरी करायची प्रतिज्ञा करून, त्यानी इंद्राशीं एवढ्या रकमेची मागणी केली. आणि न दिल्यास लढण्याची तयारी दर्शविली. इंद्रानें कुबेराकडून अयोध्या नगरीच्या बाहेर असलेल्या शमीच्या झाडावर सुवर्णमुद्रांचा वर्षाव केला. रघूनें त्या सर्व मुद्रा कौत्साला दिल्या. कौत्सानें त्या आपल्या गुरूस दिल्या; परंतु चौदा कोटीच्या वर कांहीं वरतंतू घेईना, म्हणून कौत्सानें परत आणून दिलेल्या बाकी सुवर्णमुद्रा शमीच्या झाडाखालीं ठेवून रघुराजानें त्या प्रजाजनांस लुटायला सांगितल्या. सुव्रत अशा प्रजाजनानीं त्या शमीची पूजा करून मगच त्या मुद्रा लुटल्या. तो दिवस आश्विन महिन्यांतील शुक्ल दशमीचा होता. प्रतिवर्षी रघुराज्याच्या अयोध्या नगरींत ही चाल होती; परंतु कालांतरानें फक्त शमीच्या झाडांचीं पानेंच लुटण्याचा प्रघात राहिला अशी कथा आहे.

श्रीरामचंद्रानीं रावणाशीं युद्ध करायला आश्विन शुद्ध दशमीच्या सुमुहूर्तावर सीमोल्लंघन केलें म्हणून या दिवसाला सीमोल्लंघनाचें महत्व प्राप्त झालेलें आहे अशी कथा रामायणांत आहे. पांडवांचा अज्ञातवासही याच दिवशीं संपला. विराट नगरींत जातांना सीमेवर असलेल्या दुर्गेच्या प्रतिमेची धर्मानीं भक्तीभावानें पूजा केली. आणि आपलें रक्षण करण्याची विनंति केली. धर्मराजानीं केलेलें हें दुर्गा-स्तोत्र प्रसिद्ध आहे. पांडवप्रतापांत श्रीधरानीं त्याचे सुंदर मराठी भाषांतर केलेलें आहे. धर्मराजाला प्रसन्न झालेली जगदम्बा म्हणते, "तुम्हीं वास्तव्य करा येथ। प्रगट नेदीच जनांत। शत्रू क्षय पावतील समस्त। सुख अद्भुत तुम्हां होय॥ त्वां जें हें स्तोत्र केलें संपूर्ण। तें पठण करील रात्रंदिन। त्यासी मी दुर्गा प्रसन्न होऊन। वर प्रसाद देईन॥"

**— गोपाळकृष्ण भोबे**





### या महिन्यातील माननीय व्यक्ति

## श्रीपाद अमृत डांगे

'झुंज' हा मराठी माणसाचा स्थायीभाव आहे. त्यामुळें महाराष्ट्रांत अंधश्रद्धेला थारा मिळाला नाहीं. कोणतीहि नवी गोष्ट चांगली तावून सुलाखून उत्तमप्रकारें पारखल्याशिवाय मराठी माणूस त्याचा मुळींच स्वीकार करीत नाहीं.

या दृष्टीने मराठी माणसाच्या सर्व गुणदोषांचें उत्तम प्रतीक म्हणून ख्यातनाम कामगारपुढारी श्री. श्रीपाद अमृत डांगे यांचा निर्देश करावयास हरकत नसावी. १९०० सालीं नाशिकच्या डांगे आळींत श्रीपादचा जन्म झाला. त्यांचे वडील दलालीचा धंदा करीत होते. पण आपल्या या कुशाग्र बुद्धिमत्तेच्या मुलाच्या शिक्षणाची त्यांनीं हेळसांड केली नाहीं. मॅट्रिकच्या परीक्षेनंतर डांग्यांनीं विल्सन कॉलेजमध्यें आपलें नांव दाखल केलें. त्या काळांत मुंबईत वेझंटबाईंचीं व्याख्यानें होत त्याला डांगे नियमाने जात आणि एखाद्या पटाईत जिज्ञासूच्या थाटांत त्यांना प्रश्न विचारून भंडावून सोडीत.



विल्सन कॉलेजांत त्यावेळीं बायबलचा तास सक्तीचा असे. ही सक्ती हाणून पाडण्यासाठीं डांग्यांनीं विद्यार्थ्यांचा संप घडवून आणला आणि त्या दिवसापासून इंग्रजींत उत्तमप्रकारें वक्तृत्व गाजविण्याची आणि लिहिण्याची त्यांनीं संवय लावून घेतली.

ते दिवस असहकारितेच्या चळवळीचे होते. या चळवळीकडे डांगे आकृष्ट झाले आणि त्यांनीं कॉलेजला ज्यू. बी. ए. च्या वर्गांत असतांनाच रामराम ठोकून चळवळींत भाग घेतला. पण गांधींचें तत्त्वज्ञान त्यांना आकृष्ट करूं न शकल्यामुळें त्यांनीं गांधीवाद सोडला आणि समाजवादाला पूर्णपणें वाहून घ्यावयाचा निर्धार केला.

यासाठीं त्यांनीं १९२२ सालीं सोशॅलिस्ट नांवाचें वर्तमानपत्र काढलें. आणि त्यांतून प्रखरतेनें समाजवादी चळवळीचा विचाराचा प्रचार सुरू केला. टाईम्स ऑफ इंडियानें या पत्राला बोल्शेव्हिक पेपर ऑफ बॉम्बे अशी संज्ञा दिली होती.

१९२४ सालीं गाजलेल्या कानपूर खटल्यानें तरुण डांग्यांचें नांव सर्वत्र ख्यातनाम झालें. त्यांना या खटल्यांत ४ वर्षांची शिक्षा झाली. कामगारांचा पुढारी म्हणून तुरुंगांत जाण्याचें भाग्य डांग्यांनींच प्रथमच उपभोगलें. या खटल्यांत सरकारी वकीलानें आपल्या भाषणांत—" हे लोक शेतकरी आणि कामगार यांना चिथावणी देऊन बंडास प्रवृत्त करतात आणि यांना ब्रिटिश राज्य नष्ट करावयाचें " आहे म्हणून यांना शिक्षा झाली पाहिजे असें ठांसून सांगितलें होतें. एकापरीनें हा डांग्यांच्या कार्याचा गौरवच. १९२५ सालीं डांग्यांनीं कानपूर येथें कम्युनिस्ट पार्टीची स्थापना केली. कम्युनिस्ट पार्टीच्या स्थापनेपासून डांग्याच्या प्रचाराला आणि कार्याला एक विलक्षण धार आली. त्यांनीं सायमन कमिशनवरील बहिष्काराच्या मोहिमेंत जोरदार भाग घेतला. त्याचवेळीं संपाचें शस्त्र वापरून त्यांनी कामगारांची पगार कपात थांबवली. यामुळें डांग्यांचें कामगारवर्गांतील वजन वाढलें. त्यामुळें त्यावर्षी परळ येथें झालेला हिंदुमुसलमानांचा दंगा त्यांनीं आपल्या वजनानें थांबवला अशी सरकारदप्तरीं नोंद आहे.

डांग्यांच्या प्रखर व्यक्तिमत्वाचे पैलु जगासमोर मीरत खटल्याच्या वेळीं आले. या खटल्यांत इतर सर्व प्रांतांतील आरोपी सामील असले तरी प्रामुख्यानें महाराष्ट्रीयांचीच त्यांत अधिक भाग होता. हा खटला चार वर्षें चालला. यावेळीं डांग्यांनीं स्वतःचा ७०० पृष्ठांचा प्रदीर्घ जबाब सादर केला. त्याने त्यांची प्रतिपादनशैली, एखाद्या प्रश्नाचा सखोल व्यासंग करण्याची प्रवृत्ति स्पष्टपणें प्रतीत झाली. या खटल्यांत त्यांना १२ वर्षांची शिक्षा फर्माविण्यांत आली. पण अपिलांत ती तीन वर्षांची शिक्षा झाली. हा खटला, त्यांतील आरोपी आणि त्यांना मिळालेल्या सवलती यामुळें राजकीय क्षेत्रांत एक नवें युग निर्माण करता झाला.

याचवेळीं डांग्यांनीं 'क्रान्ति' हें मराठी व 'नॅशनल फ्रंट' हें इंग्रजी साप्ताहिक चालविलें. या काळांत त्यांनीं गिरिणी मिलचा संप सतत सात महिने चालवून यशस्वी केला. १९३९ सालीं त्यांनीं मुंबईस महागाई भत्त्यासाठीं ८० हजार कामगारांचा संप सुरू केला. पुढें त्यांना अटक झाली पण पुढें कम्युनिस्टांनीं युद्धानुकूल धोरण जाहीर केल्यामुळें त्यांची सुटका झाली. त्यानंतर डांगे युरोपांत गेले आणि तेथून १२ डिसेंबर १९४५ रोजीं परत आले.

लंडन येथें भरलेल्या जागतिक कामगार परिषदेला हिंदी ट्रेड युनियन काँग्रेसचे प्रतिनिधि म्हणून डांग्यांनीं उत्तम कामगिरी बजावली. ब्लॅकपूलच्या सभेंत हिंदी स्वातंत्र्याचा ठराव त्यांनीं पास करून घेतला.

डांग्यांचें वक्तृत्व मुद्देसूद आणि आवेशपूर्ण असतें. त्यांतील व्यासंग आणि बुद्धिमत्ता श्रोत्यांची मनें आकृष्ट करतात. यामुळें मुंबई विधिमंडळाचें व्यासपीठ त्यांनी अनेकवेळा गाजवलें आहे. गेल्या निवडणुकींत मुंबईतून संयुक्त महाराष्ट्र समितीच्या तिकीटावर ते पार्लमेंटमध्यें निवडून आले. व तेथेहि त्यांनीं आपल्या तिखट वक्तृत्वशैलीनें लोकसभा गाजवली आहे.

राजकारणाच्या खटाटोपांत अष्टोप्रहर गर्क असणारा हा आंतरराष्ट्रीय कीर्तीचा कामगारपुढारी अतिशय मनमोकळा आणि बोलका आहे, मराठी वाङ्मयाचा त्यांचा चांगलाच व्यासंग आहे. गोविंदाग्रजांच्या वाग्वैजयंतीचें त्यांनीं इंग्रजींत भाषांतर केलें असून त्यांतील कांहीं कविता, यंग कॉम्रेड्‌स या नियतकालिकांत प्रसिद्ध झाल्या आहेत. संत वाङ्मयाचें त्यांचे परिशीलन सतत चालू असतें. मराठी संस्कृति आणि इतिहास याबद्दल त्यांना सदैव अभिमान आणि प्रेम वाटत आलेलें आहे.

आज ते ६० व्या वर्षांत पदार्पण करीत आहे. दीपावलीतर्फे त्यांना अभिवादन !

• • •



# रंगीत पाळणा

[ ही बाहेरची बसण्याची खोली आहे. उजव्या बाजूस भिंतीला खिडकी आहे. खिडकींतून आंतला रंगीत पाळणा दिसतो आहे. पाळणा हालत आहे आणि आंत यशोदाबाई गात आहेत. जुन्या वळणाच्या यशोदाबाई दुसरा कुठला पाळणा म्हणणार ? " सुतार उत्तमसा तुजसाठीं आणविला । पाळणा रंगीत बनविला ॥ चहुंबाजूंनीं राघुमोर बसवीले । पाळण्यांत बाळ निजवीले । निज निज बाळा गाणें गाते आई । करि बाळा जो जो गाई ॥—जो जो गाई ॥" गाणं संपतं. पाळणा स्थिर होतो. जराशानं यशोदाबाई पाण्याची रिकामी कळशी घेऊन बाहेर येतात—वाटेंतली तिचाकी बाजूला करतात आणि जाऊं लागतात तोंच सुलू येते. सुलू ही त्यांची मुलगी ससूनमध्यें नर्सिंग कोर्स घेतला आहे तिनं. तिच्या हालचालीवरून आणि कपड्यावरून तिची काल 'नाइट' होती हें स्पष्ट दिसत आहे. सुलू जराशी घाईतच प्रवेश करते. ]

**यशोदा** : केव्हां आलीस ?

**सुलू** : आत्तां हीच येते आहे. दिनू, शशी, निरु, मुलं गेलीं का परेडला ?

**यशोदा** : फार वाट पाहिली तुझी.

**सुलू** : आई, काल नाईट होती नं माझी. उठलेच उशीरा. दवाखान्यांतनं येतांना वाटेंत भाऊसाहेब भेटले, त्यामुळं वेळ लागला. येताहेत भाऊसाहेब.

**यशोदा** : पण हे घरीं नाहींत. मंडईला गेले आहेत. या आठवड्यांत त्यांची व्यवस्था करीन म्हणत होते.

**सुलू** : अग भाडं मागायला येणार नाहीं आहेत ते. आज २६ जानेवारी नाहीं का ? महिला विकास मंडळानं भाऊसाहेबांचं व्याख्यान ठेवलं आहे. त्याचीच आम्हीं तालीम करणार आहोंत.

**यशोदा** : एवढी कळशी भरून आणते.

**सुलू** : कसा आहे बेबीचा ताप ?

हरिमामासारखा दिलखुलास माणूस, हिमालयाच्या वरच्या टोंकापासून कन्याकुमारीच्या खालच्या टोंकापर्यंत फेऱ्या मारणारा, प्रवासांत रंगरंगीन गमती खिलाड्रवृत्तिनें पाहणारा, तो सुद्धां म्हणत होता—" फार कठीण आहे आपल्यासारख्याचं वय अक्का ! घरांत मीठ आहे तर तिखट नाहीं, सरपण आहे तर घासलेट नाहीं ! या महागाईनं माणसाचा मुडदाच पाडलेला आहे..."

**यशोदा :** बरं वाटतंय तिला. आतां आहेस तूं घरीं. आज न्हाशील नं तूं !

**सुलू :** न्हाणंधुणं मग. आधीं व्याख्यानाचं पहायचंय आम्हाला.

[ यशोदाबाई जातात. सुलू टेबलावर चढून रेकॉर्डसची पेटी काढते. नंतर कॉटखालून ग्रामोफोन बाहेर काढते. हानें लावते, साऊंडबॉक्स लावते, पेटींतून हवी असलेली रेकॉर्ड काढते—नि टेबलवर ठेवते. टेबल खुर्ची मधोमध येते इतक्यांत भाऊसाहेब हातांतला कागद वाचीत आणि पाठ करीत येतात. सभेची तयारी आतां झालेली आहे. सुलू अध्यक्षांच्या खुर्चीवर बसते. भाऊसाहेब शेजारीं वक्ते म्हणून बसतात. सुलू ग्रमोफोनवर " विजयी विश्वतिरंग प्यारा—झेंडा ऊंचा रहे हमारा " ही रेकॉर्ड लावते. दोन ओळी संपतांच पिन " झेंडा ऊंचावर " अडकते त्यामुळें ते शब्द तीन चारदां रिपीट होतात. सुलू ग्रामोफोन बंद करते. ]

**सुलू**—आपण ध्वजगीत ऐकलंत. ध्वजगीतानंतर आतां आजच्या सभेचे प्रमुख वक्ते आणि आपल्या अन्नपूर्णा प्रसूतिगृहाचे एक प्रमुख संस्थापक श्रीयुत रावसाहेब भाऊसाहेब इनामदार यांचें "सूतकताईची पंचवार्षिक योजना" या आजच्या अत्यंत जिव्हाळ्याच्या विषयावर भाषण होईल. आपण तें शांतपणें ऐकून घ्याल अशी मला आशा आहे. भाऊसाहेब ईनामदार—

---

## रॉ य कि णी क र

**भाऊसाहेब :** ( कोटाच्या आंतल्या खिशांतून व्याख्यानाचा कागद काढतात. वरच्या खिशांतून वाचायचा चष्मा काढून लावतात—आंतल्या उजव्या खिशांतून गांधी टोपी काढतात. डोक्यावरची पगडी टेबलावर ठेवून गांधी टोपी घालतात. तेवढ्यांत सुलू पाण्याचा तांब्या नि भांडं टेबलावर आणून ठेवते—आणि पुन्हां अध्यक्षाच्या पोजमध्यें बसते. )

**भाऊसाहेब :** ( आवाज साफ करून ) अखिल भारतीय गणराज्यान्तर्गत सूतकताईप्रेमी बंधुभगिनींनो, आपण आपल्या राणी लक्ष्मीबाई महिला मंडळातर्फे सूतकताईचा वर्ग काढीत आहा हें पाहून मला फार आनंद होत आहे. स्वातंत्र्यलक्ष्मी झांशीची राणी लक्ष्मीबाई हिनें भारताच्या स्वातंत्र्यासाठीं स्वतःचें बलिदान केलें.

**सुलू :** ( टाळ्या मारते )

**भाऊसाहेब :** काय झालं ? असं नुसत्या टाळ्या मारून त्या वीरदेवतेचें ऋण फिटणार नाहीं. झांशीच्या राणी लक्ष्मीबाईप्रमाणें आपल्यांतून अनेक झांशीच्या राण्या अवतीर्ण झाल्या पाहिजेत आणि आपण आपलें तनमन आणि धन—आपलें सर्वस्व—प्राणपणाला लावून सूतकताईचें बलिदान केलें पाहिजे तरच हा राष्ट्राचा प्रश्न सुटणार आहे !

**सुलू :** ( टाळ्या मारते – यशोदाबाई कळशी घेऊन बाजूनें आंत येतात. )

**भाऊ० :** ( थोडंसं पाणी पिऊन ) सूतकताई ! सूत आणि कताई—सूतकताई या गोड आणि गंभीर शब्दांत फार अत्यंत गोड आणि गंभीर अर्थ भरलेला आहे. सूतकताईत सूत आहे आणि ताईहि आहे. सूत हीं गंभीर अक्षरं आहेत पण ताई हीं गोड अक्षरं आहेत ! ताई म्हणजे प्रेम, ताई म्हणजे मूर्तिमंत वात्सल्य !

**सुलू :** ( टाळ्या मारते )

**भाऊ० :** रस्त्यांत एखादी ओळखीची बाई भेटली तर आपण लगेच म्हणतो, कसं काय ताई, इकडं कुठं ? तेव्हां अशी ही ताई आहे. सूतकताईत ताई आहे पण या ताईतला 'त' तप्यांतला नसून—हा 'त' तलवारींतला आहे हें विसरूं नका. " जिच्या हातीं सूतकताईची दोरी—तीच राष्ट्राते उद्धारी."

**सुलू :** [ टाळ्या मारते. चुकून भाऊसाहेबहि टाळ्या मारतात ] याचवेळीं खालीं रस्त्यांतून मिरवणूक चालली असते, तिचा लष्करी बँडचा आवाज आणि जयघोष ऐकूं येतो. " स्वतंत्र भारताचा जयजयकार असो." " इन्किलाब झिंदाबाद, " "२६ जानेवारी चिरायु होवो "—त्यासरशीं सुलू चटकन्—खुर्चीवरून उठते आणि खिडकीकडे धावते. ]

**सुलू :** भाऊसाहेब, सव्वीस जानेवारीची मिरवणूक आली. आझाद हिंद झिंदाबाद. आई, अग लौकर ये, अग लौकर ये. मिरवणूक आली.

( यशोदाबाई लुगड्यानं ओला हात पुसत बाहेर येतात. )

**सुलू :** तो बघ दिनू दिनूऽ दिनू ऽऽ ! तो बघ तिकडं, मागनं शशी आहे—शशी ऽ शश्या ऽ ऽ ( खिडकींत लावलेला तिरंगी झेंडा काढते नि जोरानें हलवते ) आझाद-हिंद-झिंदाबाद !

**भाऊ० :** स्वतंत्र भारताचा जयजयकार असो.

**सुलू :** सव्वीस जानवारी अमर रहे ! काय ऐटींत पावलं टाकीत चालले आहेत. लेफ्ट राइट—लेफ्ट राइट—लेफ्ट.

**भाऊ० :** लेफ्ट—लेफ्ट—लेफ्ट ! कमीत कमी पांच हजार मुलं असतील नाहीं ?

**सुलू :** पांच हजार ? अहो, दहा हजार नक्की—असतील.

**भाऊ० :** दहा हजार ! एवढी कार्टी आहेत आपल्या गांवांत ?

**सुलू :** भाऊसाहेब, दरवर्षी लग्नाच्या बाजंत्र्या किती वाजतात, ऐकत नाहीं का आपण—






**भाऊ०** : अलीकडे वाजंत्री कुठं वाजते ? लग्नांत आतां बॅंडबाजाच वाजतो, इतकीं मुलं गांवांत आहेत नि तुम्ही म्हणतां, स्त्रियांसाठीं घरगुती उद्योगधंदे नाहींत !

**सुलू** : इश्श !

**यशोदा** : पण सुलू, निरू नाहीं ग दिसली कुठं ?

**सुलू** : अग मुलींची मिरवणूक मागनं यायची असेल.

**यशोदा** : निरू आली कीं मला हांक मार हं. वेबीला अजून औषध द्यायचं आहे.

**भाऊ०** : का, वेबीला बरं नाहीं ?

**यशोदा** : चार दिवस झाले. बारीकसा ताप येतोय तिला.

**भाऊ०** : तरीच. मी म्हणतों आहे, आज हें घर इतकं शांत कसं ? वेबीची गडबड नाहीं—बडबड नाहीं.

**सुलू** : बरं कुठपर्यंत आलं होतं आपलं ? हं, "जिच्या हातीं सूतकताईची दोरी—तीच जगातें उद्धारी" भाऊसाहेब, हें टाळीचं वाक्य आहे. या तुमच्या वाक्यावर खाडखाड टाळ्या पडतील पहा—

**भाऊ०** : पण सुलूताई, हें व्याख्यान जमणार नाहीं आपल्याला.

**सुलू** : कां—कां ?

**भाऊ** : छे ! जमणार नाहीं. अजून हा अर्धा कागदहि पाठ झाला नाहीं माझा. गेले तीन दिवस अहोरात्र घोकतों आहे. एवढी पाठपोट दोन पानं पाठ करतां करतां जीव जाईल माझा. हे लेकाचे पुढारी कसं फाडफाड व्याख्यान देतात परमेश्वराला माहित.

**सुलू** : अहो तो धंदा आहे त्यांचा. अशीं दोनचार व्याख्यानं सतत घटवून घटवून ठेवावींच लागतात त्यांना. नाहीं तर कोण कुत्रं ऐकणार आहे त्यांचं. डोक्यावर नुसती गांधी टोपी टाकून मिरवायचे दिवस आतां संपले भाऊसाहेब. दहा दहा हजारांच्या सभेत तोंड वाजवतां आलं पाहिजे आतां तरच पुढारीपण टिकतं.

**भाऊ०** : खरं आहे. आपला तो ढोबळे नगराध्यक्ष ! परवांच्या म्युनिसिपालिटीच्या निवडणुकींत काय गुरासारखा ओरडत होता लेकाचा. मतदान संपलं नि आठवडाभर त्याची बायको म्हणे मिठाच्या गरम पाण्यानं त्याचं नरडं शेकत होती. आणि त्याचा प्रतिस्पर्धी तो बुवणे सावकार—? निवडणूक संपतांच सरळ गायतोंड्याच्या दवाखान्यांत जाऊन आडवा पडला !

**सुलू** : मतदारांपुढं ओरडून ओरडून त्या बिचाऱ्याचा तर आवाजच गेला, असं ऐकलं आम्ही.

**भाऊ०** : आवाज गेला म्हणजे कायमचा गेला ! ही व्होकल कॉर्ड का काय असते ना, तीच म्हणे बोंबलली ! आठ दिवस बोलणं हसणं बंद. नुसतं खुणेनंच होय नाहीं चाललं होतं.

**सुलू** : अन् मग ?

**भाऊ०** : मग काय ? बाराव्या दिवशीं गायतोंड्याच्या कंपाउंडरनं बिल ठेवलं त्याच्या हातांत—अठ्ठेचाळीस रुपये चौदा आणे ! बुवण्याची बुवळं, तें बिल पाहतांच, एकदम गरगरली नि फटकन् आवाज सुटला—बदमाश, एवढं बिल झालं ! आवाज सुटतांच गायतोंड्यानं पुन्हां पांच रुपये वाढविले बिलांत. झालं. दिलं बिल, मुकाट्यानं. अन् आला घरीं ठणाणा करीत.

**सुलू** : पण निवडणूक जिंकली ?

**भाऊ०** : छा. एकदम साफ उताणा पडला ! कुठं आमचा ढोबळे—बैलासारखा दणदणीत आवाज अन् कुठं हा बुवण्या—बकऱ्यासारखा किरटा आवाज ! कुठं ती युद्धांतली नौबत नि कुठं वाण्याच्या प्रेतापुढची ही पिपाणी ! व्याख्यानं झोडणं म्हणजे काय पोरखेळ आहे ?

**सुलू** : हो ना ? म्हणूनच म्हणते, अजून सहा तास आहेत सभेला. भाऊसाहेब, हीं दोन तर पानं आहेत—सहज तोंडांत बसतील—हं, करं या का सुरू—जिच्या हातीं सूतकताईची दोरी—

**भाऊ०** : (जोरांत) तीच राष्ट्राते उद्धारी ! भारतांतील चाळीस कोटी जनता आज चाळीस कोटी कंठांतून एकच एक मागणी करीत आहे—

[ बाहेरून हरिमामा प्रवेश करतो—त्याची घंदेवाईक ललकारी आधीं ऐकूं येते—"सरदर्द, खांसी और बुखारके लिये एकही जबरदस्त दवा है—जिसकी इस्तेमाल भारतदेशकी चालीस करोड जनता कर रही है—अश्विनी कुमार फार्मसी, मथुरा की बिल्कुल पेटंट दवा—घोडा छाप—']

**हरिमामा** : (प्र०) घोडा छाप—अमृत बिंदू !

**सुलू** : अय्या, हरिमामा ! मी ओळखलंच नाहीं. आई ग, हरिमामा आला आहे.

**हरि०** : यास्. हरिमामा हॅज कम.

**यशोदा** : (घाईनेच प्र०) हरी ! अरे पत्र नाहीं, निरोप नाहीं. कुठून येतो आहेस तूं ?

**हरि०** : कुठून ? सी धिस रुद्राक्ष गार्लंड अँड सी धिस गोटा ?

**यशोदा**
**सुलू** } म्हणजे ?

**हरि०** : घाबरायचं कारण नाहीं. तसं कांहीं एक झालेलं नाहीं. सगळं ठाकठीक आहे घरीं. हरिद्वारला गेलो होतो अक्का.

**सुलू** : हरिद्वार ?

**हरि** : हरिद्वार अँड हृषीकेश थेट हिमालयाचं टोक गांठलं यावेळीं. असा सपाटून--बिझिनेस हाणलाय कीं विचारूं नकोस. फोर थाऊजंड ॲन्ड फाइव हंड्रेड ॲन्ड फिफ्टी—चार हजार पांचशे पन्नास-कॅश ऑर्डर-नो जोक ! अश्विनी कुमार फार्मसी, मथुरा,--बिगेस्ट औषधी कन्सर्न इन अवर आशिया खंड-आणि एकच पेटंट मेडिसीन.

**सुलू** : घोडा छाप--अमृतबिंदू !

**हरि०** : ए वन् !

**भाऊ०** : हृषीकेश म्हणजे हिमालयाचा पायथाच जवळ जवळ.

**हरि०** : वेळ असता तर हिमालय ओलांडून तिबेटांत देखील जाऊन आलो असतो.

**सुलू** : तिबेट ?

**हरि०** : यास्—तिब्बट ! तिब्बटचा तो बंकमलामा ? आमच्या घोडाछाप अमृतबिंदूचा एक छोटा डोस मारल्याखेरीज त्याला मुळीं झोपच येत नाहीं रात्रीं.

**सुलू** : काय म्हणतोस मामा ?

**हरि०** : येस मॅडम. घोडाछाप अमृतबिंदू-- ए वन् ! हे कोण ?

**सुलू** : छान. कमाल आहे तुझी. हे आपले भाऊसाहेब--या बिल्डिंगचे मालक.








**हरि०** : ओ, आय सी. आय रिमेंबर नाऊ. रावसाहेब भाऊसाहेब इनामदार. ग्लॅड टु मीट यू, आय ॲम हरिमामा. अश्विनीकुमार फार्मसी मथुरा, यू नो ?

**भाऊ०** : ऐकलं आहे तें नांव.

**हरि०** : म्हणजे तुम्ही कधीं आजारी बिजारी पडतां कीं नाहीं ?

**भाऊ०** : परमेश्वरकृपेनं अजूनपर्यंत सुंठ देखील उगाळून लावावी लागली नाहीं या कपाळाला.

**हरि०** : गुड. पण आतां पुढं मात्र हें नांव लक्षांत ठेवा घोडा छाप—

**सुलू** : अमृतबिंदू

**भाऊ०** : ए वन् !

**हरि०** : सुले, एक नवटाक चहा तरी आधीं देशील का नाहीं तुझ्या मामाला ? हिमालयाची एवढी रौंड मारून आला आहे हा—

**यशोदा** : ठेवते चहा—तूं आधीं कपडे काढ, हातपाय धू—काय रे हे कपडे !

**हरि०** : दिन्या, शश्या, निन्या, पक्या—कुठं गेलीं आहेत तुझीं डॅम्बीस मुलं ?

**सुलू** : आज सव्वीस जानेवारी नाहीं का ? परेडला गेलीं आहेत तीं.

**हरि०** : आज सव्वीस जानेवारी ? घ्या. आम्ही समजतो आहोंत आज तीस एकतीस फेब्रुवारी असेल ! तरीच. गांवांत तिरंगी बावटे दिसले ! आय सी. सव्वीस जानेवारी. ग्रेट डे ! ॲक्सेप्ट माय जयहिंद भाऊसाहेब.

**सुलू** : आज संध्याकाळीं भाऊसाहेबांचं व्याख्यान आहे, अन्नपूर्णा प्रसूतिगृहाच्या पटांगणांत.

**हरि०** : प्रसूतिगृहाच्या पटांगणांत ? खूप जागा शोधून काढलीत तुम्ही. अरे मग आमचं ठेवा कीं तिथं व्याख्यान. असं ठोकून देतों कीं प्रसूतिगृहांतल्या अडलेल्या बायाबापड्यांची एका दमांत सुटका होईल ! काय आवाज आहे आमचा भाऊसाहेब ! हीं असलीं औषधं विकणं म्हणजे चेष्टा नाहीं सुलोचनाबाई ! दहादहा तास कोकलावं लागतं गिऱ्हाइकांपुढं तेव्हां कुठं एखादी बाटली खपते—तीहि सॅम्पल ! सच्चिदानंद !

**भाऊ** : हृषीकेश म्हणजे फारच रम्य क्षेत्र आहे तें.

**हरि०** : रम्य म्हणजे एकदम ब्युटिफुल—ए वन् ! उगीच नाहीं एक हजार हजार वर्षं समाधी लावून आमचे ऋषि लोक बसले होते तिथं. भाऊसाहेब, संसाराच्या या मोहजालांत आम्ही अडकलों नसतों तर बास—अशी बैठक मारली असती आम्ही—दहावीस वर्षं हललों नसतों तिथून ! पण परमेश्वरानं आमच्या गळ्यांत एक बायको आणि दोन कार्टी बांधलीं आहेत. तसं म्हणाल तर महिन्यांतून एकदां रेशन आणून टाकणं आणि वर्षांतून एकदां मुलांच्या चड्डया नि कुडतीं शिवायला देणं या पलिकडं घरचा नि आमचा कांहीं संबंध उरलेला नाहीं. सच्चिदानंद ! हरिद्वारची गंगामय्या तुम्ही पाहिली नसेल भाऊसाहेब ! एकदम होली वॉटर—आइस कोल्ड—बर्फ ! साधी एक बुडी मारा रुद्राक्ष चढतील कपाळांत. उगीच का हे लोक हरिद्वारच्या गंगेंत अस्थि नेऊन टाकतात ? सच्चिदानंद. अक्का, ही गंगा आणली आहे तुझ्यासाठीं.

**यशोदा०** : पाणी काढलंय, आंघोळ करतोयस नं तूं ? चल आटप लवकर.

**हरि०** : आंघोळीची कसली घाई करतेस अक्का. अख्ख्या आयुष्यांत या आंघोळीपलीकडं कांहीं केलंय का आम्ही ? आज चाळीस वर्षं आपली आंघोळच चालली आहे आमची. आमचे सच्चिदानंद स्वामी म्हणतात तें कांहीं खोटं नाहीं—काय बरं म्हणतात तें ?

**सुलू०** : हें नवीन काय खूळ काढलं आहेस ? कोण आहे हा तुझा सच्चिदानंद ?

**हरि०** : घ्या. सच्चिदानंदस्वामी कोण ? सांगा भाऊसाहेब तुम्हींच.

**भाऊ०** : मीहि ऐकलं नाहीं तें नांव.

**हरि०** : नाहीं ? फुकट जन्म घालवलात ! मग या साठ वर्षांत केलंत काय तुम्ही ? नुसती एकामागनं एक घर बांधीत सुटलात ! धन्य आहे. हे लोक वेळेवर भाडं तरी देतात का ? मग ठीक आहे. सच्चिदानंद.

( खिशांतला छोटा फोटो काढून कपाळाला लावतो )

**सुलू** : पांहूं—पाहूं ( पण हरिमामा फोटो देत नाहीं ) कुठं भेटले हे ?

**हरि०**—हिमालयाच्या एका गुहेंत हा बालमुनी आज अडीचशें वर्षं समाधी लावून बसला आहे. ऐसा भारी योगी हमने अभीतक जन्मांत नहीं देखा. काय त्या लांब सडक जटा, काय ते तेजस्वी डोळे, काय तें भव्य कपाळ, काय ती तेजःपुंज कान्ति—या देहांतली कुंडलिनी जागृत करावी—ती त्यांनींच !

**सुलू** : कुठं असते ही कुंडलिनी ?

**हरि०** : इथं ढुंगणाजवळ. हें हें माकडहाड आहे कीं नाहीं—बास तिथंच. एकदां का ही कुंडलिनी जागी झाली कीं माणूस वीतभर उंच अधांतरी राहतो.

**सुलू** : काय थापा मारतो आहेस—

**हरि** : थापा ? यांना विचार. काय भाऊसाहेब ?

आला, आला, संयुक्त महाराष्ट्र आला ! !



मंगल कलश...माझा मंगल कलश ! !



अनुक्रमणिका

**भाऊ० :** ज्यांना योगशास्त्र साध्य आहे त्या महापुरुषांना तें कठीण नाहीं.

**हरि० :** ऐक.

**सुलू :** तुम्ही काय त्याचं ऐकता भाऊसाहेब.

**हरि० :** ही आमची किंमत या घरांत. या हरिमामाला जगांत फक्त एकाच माणसानं ओळखलं आहे. कोण ?

**सुलू :** सच्चिदानंद !

**हरि० :** उगीच नाहीं. त्यांनीं आदेश देतांच हा गोटा केला नि ही माळ अडकविली गळ्यांत. बारामुखी रुद्राक्ष आहे हा—! एकदम कडक उग्र साधना आहे ही बाईसाहेब. तुला घ्यायचं आहे त्या महापुरुषाचं दर्शन ?

**सुलू :** तुझं दर्शन झालं तें पुरं आहे आम्हाला.

**हरि० :** सी धीस भाऊसाहेब—सच्चिदानंद !

( कपाळाला लावून तो छोटा फोटो भाऊंना देतो )

**भाऊ० :** ( टक लावून पाहतात, गंभीर होऊन ) कुठं भेटला हा ! कुठं—कुठं—दिसला तुम्हाला हा ? सच्चिदानंद ? असाच चेहरा—हेच डोळे—असंच नाक—हीच हनुवटी—हाच हाच तो—सच्चिदानंद ! ( छातीशीं धरतात )

**हरि० :** पाहिलंस म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून पाणी फुटलं. उगीच नाहीं ! भाऊसाहेब, सच्चिदानंदांना मी आमंत्रण देऊन आलो आहे—स्वामीजी आप इधर एकदां हमारे गांवकू पधारिये.

**भाऊ० :** मग काय म्हणाले ते ? तुमचं आमंत्रण स्वीकारलं का त्यांनी ? तो नाहीं यायचा इकडं !

**हरि० :** नाहीं ? या हरिमामानं बोलावल्यावर ? येतो—आम्ही अवश्य येऊं म्हणाले—

**भाऊ० :** मामा, हा फोटो ठेऊं का माझ्याजवळ—मागाल ती किंमत देईन.

**हरि० :** तो माझ्या पूजेंतला आहे. दुसरा एक आहे, पाठवून देईन तुमच्या घरीं.

**सुलू :** भाऊसाहेब, आणखीन् थोडा वेळ राहिलांत इथं तर हा वेड लावील तुम्हांला.

**भाऊ० :** कुणी तरी मला वेड लावावं असं आजवर वाटत होतं—सुलूताई, आज तें घडलं ! बारा वर्षांनीं तें घडलं–( डोळे पुसतात. )

**हरि० :** अरे, आमच्या अध्यात्मिक मार्गांत तुमची इतकी प्रगति झाली आहे—इतके तुम्ही पुढें गेलेले आहांत—मला कल्पना नव्हती ! बास-शेक ! आजपासून आपण गुरुबंधु झालों ! घाला ही माळ. सच्चिदानंद !

**भाऊ० :** सुलूताई, ठरलं.

**सुलू :** काय ?

**भाऊ० :** आजचं व्याख्यान रहित. सरळ घरीं जावं नि डोळे मिटून निवांत पडून रहावं असं वाटूं लागलंय मला–येतो मी.

**हरि० :** मग तुम्ही देणार नसाल तर आम्ही देऊं की व्याख्यान. आहे काय त्यांत ? बायकांच्या सभेंत व्याख्यान द्यायला अशी काय अक्कल लागते–-निदान आमच्या आठ दहा बाटल्या तरी खपतील ! जा तुम्ही-जाऊन झकास झोप काढा-द्या ताणून कोण विचारणार-आहे तुम्हाला घरीं ? जातांना ही सॅम्पल बाटली न्या बरोबर अन् हाणा एक डोस—

( भाऊसाहेब खिन्न मनानें जातात. )

**यशोदा :** काय झालं त्यांना ?

**हरि० :** अगदीं कामांतून गेला म्हातारा. निकाल लागला.

**सुलू :** तुझ्यासारखे भेटल्यावर कुणाचा निकाल लागायचा नाहीं ! उठा आतां. सगळा शहाण्यांचा बाजार भरला आहे या घरांत.

**यशोदा :** बरं आतां थोडं माझ्याशीं बोल. मामी बरी आहे ना ?

**हरि० :** तिला काय धाड झाली आहे ? ठणठणीत प्रकृति आहे माउलीची.

**सुलू :** हें असलं बोलणं.

**हरि० :** नाहीं तर काय. नवरा असा बारा महिने चोवीस तास पदयात्रा करीत वणवण भटकतो आहे पण ती बाई कधी असं नाहीं म्हणाली, खूप थकलात, चार दिवस घरीं रहा आतां. घरीं गेलो कीं, चार दिवसावर आमचा मुक्काम टिकत नाहीं.

**सुलू :** बरोबर आहे मामीचं. तुम्हीं घरीं नीट वागाल तर ना ? तिचं काय चुकतं ? परवांच त्या बोरवणकर काकू अकोल्याला जाऊन आल्या—त्या सांगत होत्या—

**हरि० :** बोरवणकर म्हणजे तो फटफट्या बोरवणकर ? त्याची बायको–

**सुलू :** हो. तर त्या काय सांगत होत्या माहीत आहे ?

**हरि० :** काय ?

**सुलू :** सांगू का ?

**हरि० :** ऐकतो आहे.

**सुलू :** मामीला म्हणें पुन्हां दिवस गेलेत !

**हरि० :** अंह. ओल्ड स्टोरी. फार शिळी बातमी. चार महिन्यापूर्वीची गोष्ट आहे ती. बरं कां अक्का, त्यावेळीं चुकून आमचा मुक्काम महिनाभर घरीं पडला होता. अशाच एका सकाळीं तुमच्या मामी उशीरा उठल्या. आम्ही नेहमीप्रमाणं म्हटलं; चहा द्या की आम्हाला, तेव्हां तुझ्या मामीनं काय म्हणावं ?

**सुलू :** काय ?

**हरि० :** तो तिथं स्टोव्ह आहे. पेटवा नि तुम्हीच चहाचं आधण टाका. आम्ही विचारलं का, काय होतंय तुम्हाला ? त्या म्हणाल्या, काल रात्रींपासून ओकारी आल्यासारखं वाटतंय—हरे राम ! ठार मेलो ! आम्ही मटकन् डोकं धरून खालीं बसलो.

---

**लाजाळूचीं झाडें !**

• • • तो माझ्या वस्त्राची गांठ शोधीत होता व ती तर अगोदरच सुटलेली होती. त्याची हालचाल लक्षांत आली तेव्हां मी हंसून त्याला गाढ आलिंगन दिलें, तेव्हां तोहि लाजला.

— गाथासप्तशती ४·५२

---

**सुलू :** मग ?

**हरि० :** मग काय ? तसाच उघड्या अंगानं धांवत गेलो नि त्या ओकबाईला बोलावून आणलं, कळवळून सांगितलं वाटल्यास डब्बल फी घ्या डॉक्टरीणबाई, पण यांना नीट तपासा —

**यशोदा :** मग ?

**हरि० :** दहा एक मिनिटांनीं बाई खोलीबाहेर आल्या आणि पुढचे बारा दांत दाखवीत हंसायला लागल्या —

**सुलू :** मग ?

**हरि० :** मग काय — घाम फुटला. मग जराशानं त्या म्हणाल्या कीं कांहीं नाहीं, रात्रींच्या जाग्रणानं पित्त होतं — पित्तामुळं डोकं जरासं चढलं कीं ओकारी आल्यासारखी वाटते माणसाला — हें ऐकलं नि सरळ त्यांच्या पायावर दहा रुपये नि हें डोकं ठेवलं आम्ही. सायंकाळीं पांच रुपयाचें पेढे वाटले मारुतीला !

**सुलू :** इश्श — कांहींतरीच काय !

**यशोदा :** दोनच मुलं आहेत तुला, तर तूं असं बोलतोस.

**हरि० :** खरोखर धन्य आहे तुझ्या नवऱ्याची ! सहा मुलांचा हा जगन्नाथाचा रथ हा पठ्ठ्या कसा ओढीत असेल देव जाणे ! अजून कसें आले नाहींत बापूराव ?

**यशोदा :** येतील इतक्यांत. आलें हं.

**सुलू :** मामा, एवढा हरिद्वारला जाऊन आलास — पण कांहीं आणलंस का नाहीं येतांना बरोबर ?

**हरि० :** विसरलोंच कीं. अक्काला बोलाव. बोलाव अक्काला.

**सुलू :** आई ऽ ऽ !

**यशोदा :** काय आतां सांगणार आहेस ?

**हरि० :** सांगणार नाहीं, दाखवणार आहे. येतांना दिल्ली करून आलों.

**यशोदा :** मग कांहीं आणलंस का घरीं नेण्यासाठीं ?

**हरि० :** यस सर. बाबा लोक, डोळे मिटो और टाली बजाओ. ये देखिए, देहलीकी खास बडी नुमायशदार चीज —

**सुलू :** अय्या. चड्डी आणि शर्ट ?

**हरि० :** तुझ्या दिन्यासाठीं. ही हॅट त्याची.

**सुलू :** काय मस्त आहे कापड — !

**हरि० :** तो स्टार बघ शर्टच्या खांद्यावर. जनरल थिम्मयाचा ड्रेस आहे हा. ॲंड धिस इज जनरल करीअप्पा ! आमच्या शशी-बाबूसाठीं —

**सुलू :** काय बेफाम आहे. केवढ्याला घेतलास ?

**यशोदा :** कशाला हा नसता खर्च केलास — परवांच तर मुलांना नवे कपडे शिवले होते —

**हरि० :** तुमचे नवे कपडे आम्ही पाहिलेत. चड्डयाच्या ढुंगणाला एवढाला पॅच अन् शर्टच्या खांद्याला एवढं मोठं ठिगळ ! भोवारणीला द्यायचे कपडे माझ्या भाच्यांनीं वापरावेत — हॅट — नाउ सी धिस — फ्रॉक-निरुसाठीं —

**सुलू :** अय्या.

**हरि० :** लेडी मौंटबॅटन कापड आहे तें. नो जोक.

**यशोदा :** खिशांत पैसे असले की असे उधळतोस —

**सुलू :** उगीच नाहीं मामी ओरडत तुझ्या नांवानं.

**हरि० :** कुठल्या आयडियल नवऱ्याची बायको आपल्या पतीच्या नांवानं ओरडत नाहीं ? आपल्या आदर्श पतीच्या नांवानं सतत ठणाणा करीत राहणं हा तर आमच्या भारतांतील प्रत्येक धर्मपत्नीचा जन्मसिद्ध हक्क आहे.

**सुलू :** आई, याच्या खिशांत पैसे आणखीन असते तर यानं दिल्लीचा लाल किल्लासुद्धां आणला असता !

**हरि० :** ऑफ कोर्स. दिल्लीचा लाल किल्ला काय कुणाच्या बापाच्या माल आहे ? भारतांतील आमच्यासारख्या चार मामांनीं ठरवलं तर लिलावांत घेऊन टाकूं तो. आहे काय नि नाहीं काय ! बास अब एकही चीज —

**सुलू :** चांदीची मूर्ति ? गोपाळकृष्ण.

**हरि० :** गोपालकृष्ण ! मुरलीधर ! अक्का, तूं म्हणत होतीस ना ? आमची पांच वर्षांची भाऊबीज शिल्लक राहिली आहे.

[ बापूराव प्रवेश करतात. ]

**सुलू :** बापू आले.

**बापू :** अरे तुम्ही केव्हां आलात ? अन् तूं केव्हां आलीस ?



## टाका फांसे हळुवार

टाका फांसे हळुवार, खेळा नजर जुगार,
कवळ्या काळ्याचा शिणगार,
घाला मज सजणा

सैल करा बाजूबंद, नको मिठी चिरेबंद,
थरथरे कटिबंद अहो मनमोहना

मी नागवेली पान, तव्या नवतीचं छान,
नख लाऊनी गुमान नका तोडू कटकन्

काया नाजुक मुलाम, जसं कागदी बदाम,
सराईत तुमचं काम चिमटीत फुटल् टचकन्

घ्या दान दहाचे चितकवडी हो उलटी
मुळिं वरती सरेना पटावरिल सोंगटी
जरि उठवळ मोठी तरीहि सुटेना कटी

आला बाई अंगलटी, सामना हा अटीतटी,
वरद ही बाहुवटीं झेला हो रतिरमणा

पुरे करा चौसर, नाही आता औसर,
जितल सयंवर चुरला हो दवणा

— राजा बढे

**यशोदा :** हरिद्वार, हृषीकेश करून आलाय तो.

**सुलू :** अन् बापू दिल्लीहून मामानं दिनू–शशी निरुसाठीं हे कपडे आणलेत. अन् आईसाठीं ही मूर्ति आणली आहे. कित्ती सुंदर आहे नाहीं !

**बापू० :** फारच अप्रतीम. पाहिलंत, पाठचा भाऊ असावा तर असा.

**यशोदा :** पण याबाचून का आतां अडलं होतं !

**बापू० :** विनाकारण खर्च केला तुम्ही.

**हरि० :** माझ्या बहिणीसाठीं खर्च केला मी. तुमच्यासाठीं छदामही खर्च करायची आपली तयारी नाहीं. बोलून चालून तुम्ही संत तुकाराम. आतां पंढरपूरला गेलो कीं तुमच्यासाठीं एक झकास तंबोरी नि दोन चिपळ्या आणीन मी.

**सुलू० :** ए हरिमामा, पण मी तशीच कोरडी राहिले कीं, माझ्यासाठीं मात्र कांहीं आणलं नाहींस ना !

**हरि० :** आणलं नाहीं. पण पाहून ठेवली आहे एक वस्तू. अगदीं एव वन्. नाचायला लागशील नुसतं वर्णन केलं त्याचं तर.

**बापू० :** असं !

**सुलू० :** त्याचं काय ऐकता बापू !

**हरि० :** सांगू ! काय ग अक्का सांगू का !

**यशोदा० :** ऐकूं दे तर खरं.

**हरि० :** बरं का सुले, अशी एक चीज हेरून ठेवली आहे म्हणतेस दिल्लींला होतो तेव्हां. एकदम स्मार्ट, देखणा, वय वर्षे तीस, उंची– पांच फूट चार इंच, छाती बत्तीस इंच,— सुलूच्या रूपाचं वर्णन ऐकून फुगलेली छाती—-वेचाळीस इंच—वेट, वजन एकशें वेचाळीस पौंड– एम. ए. पगार अडीचशे प्लस डीअरनेस अलाउन्स ! बोला.

**सुलू० :** पुरे.

**हरि० :** आतां का !

**बापू० :** वा ! छान केलंस.

**हरि० :** आय हॅव ऑलरेडी बुक्ड हिम. पांचशे रुपये ॲडव्हान्स भरून रिझर्व केलंय तें स्थळ. नो जोक. थट्टा नाहीं.

**यशोदा० :** खरंच कीं काय.

**सुलू० :** तो सांगणार नि तुम्ही ऐकणार !

**बापू० :** असेल खरं. प्रवासांत मोठमोठ्यांच्या गांठीभेटी घडतात.

**हरि० :** तर. तो मुलगा नि मी दिल्लींत एकाच हॉटेलांत— जेवत होतो. जेवतांना गप्पा मारता मारता गटवला त्याला नि काय ! येतांना स्टेशनावर मला पोचवायला आला होता. गाडी सुटायच्यावेळीं म्हणतो मला, अहो हरिमामा, तुम्हीं मला ओळखलंच नाहींत तर अजून—अहो मी अकोल्याच्या रास्ते डॉक्टरांचा भाचा— निळू गोखले. हात्तेरी, मी म्हटलं, निळ्या लेका छान बनवलंस.

**बापू० :** रास्ते डॉक्टर अकोल्याचे— मी ओळखतो.

**हरि० :** ही इज इन माय पॉकेट ! बोला आतां सुलूताई, काय विचार आहे तुमचा !

**सुलू :** आई बघ ग.

**यशोदा० :** का उगीच छळतोस तिला !



अनुक्रमणिका

**हरि०** : हा छळ आहे! नवरा पाहणं म्हणजे छळ आहे! ऐकलंत बापूराव.

**बापू०** : पण एका माणसाच्या गालावर अशा गुदगुल्या फुटताहेत—!

**सुलू** : जाते मी.

**हरि०** : पण जातांना निदान 'थँक्यू मामा' तर म्हणशील? एवढं तरी ऐकूं द्या आम्हाला—म्हणजे आमच्या श्रमांचं सार्थक झालं म्हणूं. त्याखेरीज सोडणार नाहीं.

**सुलू** : थँक्यू. सोड आतां.

**हरि०** : छट्. याला काय थँक्यू म्हणतात?

**सुलू** : मग उखाणा घेऊन थँक्यू म्हणू वाटतं?

**हरि०** : उखाणा आता नाहीं. पुढं नंतर, झाल्यावर. आतां एक फक्त गोड गाणं ऐकवा—म्हणजे घेतलेले हे कष्ट आमचे हलके होतील. हा गोपालकृष्ण—माझा होल्डॉलमध्यें होता म्हणून हें घडलं हं. सारी या भगवंताची कृपा—मुरलीधर, तूं बाबा आतां या टेबलावर बस. ही तुझ्यावरनं एक गाणं म्हणणार आहे. सुलूताई, "एकच गाणें गाई. मागणे लई नाहीं, लई नाहीं."

**बापू०** : अग्रीकड फार सुरेख गाते.

**हरि०** : तुमची शिफारस नको आहे. आम्हाला देवानं कान दिले आहेत. हं—

**यशोदा०** : इतकं आळवतो आहे, तर येईल तसं म्हणावं—आपलं.

**हरि०** : हं करूं अनाउन्स. अब सुश्रेचनादेवी जोशी भगवान किशनजीका एक दर्दभरी गीत सुनायेगी. सुलोचना जोशी—

**सुलू** : (गाते)

(गाणं संपतांच हरिमामा टाळ्या मारतो. बापूराव सुलूच्या पाठीवरून हात फिरवतात, सुलू आईला बिलगते.)

**यशोदा** : चल. तुला न्हायचंय ना? एवढेच ना कपडे तुझे! सोड्यांत घालून धुवायला देते. मुलं येतील इतक्यांत नि भूक भूक करतील.

**हरि०** : अक्का, वासूचं कांहीं बडोद्याहून पत्र?

**बापू०** : हें दुसरं वर्ष एन्जीनियरिंगचं त्याचं.

**हरि०** : की सुटलांत तुम्हीं. फार हुषार आहे तो. पुढचं एक वर्ष संपलं कीं वासू तुमच्या हाताखाली येईल. तेवढंच ओझं हलकं होईल तुमचं! अक्का, त्याला स्कॉलरशिप असेल नाहीं का ग?

**यशोदा** : गेल्या सहामाहींत होती...पण मध्यें तो आजारी पडला—परीक्षेला बसता आलं नाहीं.

**बापू०** : पण तो वार्षिक परीक्षेत नक्की पहिल्या वर्गात पास होईल

**हरि०** : होईल म्हणजे होणारच. कुणाचा भाचा आहे तो! अक्का, फार कठीण आहे आपल्यासारख्यांचं बघ. घरांत मीठ आहे तर तिखट नाहीं, सर्पण आहे तर घासलेट नाहीं! या महागाईनं तर माणसाचा जवळ जवळ अर्धा मुडदाच पाडला आहे!

**बापू०** : खरं आहे, रस्त्यांतून येतांना पाहात होतो. आज एवढी सव्वीस जानेवारी! पण एकहि माणूस असा आडळला नाहीं कीं, ज्याच्या डोळ्यांतून अलोट उत्साह नि आनंद ओसंडून वाहतो आहे!

**हरि०** : काय वाटलं, हे डोळे म्हणजे काय न्हाव्याच्या दुकानांतली, दाढी केल्यानंतर पाण्याचा फवारा मारतात, तशी बाटली आहे! आपला मारला पंप कीं—आनंदाचे फवारे उडताहेत!

**सुलू** : (प्र०) चार दिवस झाले, आई म्हणते बेबीचं बरासं अंग मोडून आलं आहे.

**हरि०** : अरे मी समजतो आहे, ती कार्टी न्हाऊन झोपली असेल-कशाला उगीच उठवा.

**सुलू** : मग तुझ्याकडं आहे का एखादं औषध तापावर?

**हरि०** : तुम्ही आपले सरळ तुमच्या डॉक्टरला दाखवा. आमची घोडा छाप औषधं फक्त गर्भश्रीमंतांसाठीं आहेत.

**सुलू** : छान. असलींच कां औषधं विकतो आहेस?

**हरि०** : काय करतेस सुले, हें पोट आहे ना? नाना सोंगं घेऊन, नाना हिकमती करून, तें पोट जाळणं भाग आहे! दहा गाढवासारखं हें ओझं वाहात धांवतो आहे. तें सगळं पाप धुवून काढण्यासाठीं तर हरिद्वारला जाऊन गंगेत एकशेआठ बुड्या मारल्या!

**बापू** : कुठं चाललीस?

**सुलू** : बेबीला दाखवून आणते त्या देसाई डॉक्टरांना.

**हरि०** : देसाई म्हणजे तो, तोतरा देसाईच ना. सांग त्याला माझं नांव—ही नोज मी म्हणावं, ईश्वराला स्मरून औषध दे—नुसतं लाल पाणी भरून देऊं नकोस बाटलींतून. मी भेटणार आहे त्याला संध्याकाळीं.

**सुलू** : अच्छा. येते बापू. येईपर्यंत तूं आहेस नं घरीं?

(बेबीला घेऊन जाते)

**हरि** : मी एक साधा बॉथ घेतो, नि जाऊन येतो. एक अर्जंट ऑर्डर आहे—ते औषधाचे खोकं टाकायचं आहे एकाकडं, मग आल्यावर फर्स्टक्लास आंघोळ करीन अक्का. (आंत जातो)

**बापू** : मामा आले आहेत. कांहीं आणायचं आहे का बाजारांतून?

**यशोदा** : तो का परका आहे? मघाशीं शेजारून आतांपुरतं गव्हाचं पीठ आणलंय. एखादी भाजी मात्र आणायला हवी.









**बापू :** आणीन ना. ( कोटाच्या खिशांतून काढीत ) या काकड्या दिसल्या रस्त्यांत.

**यशोदा :** मग नको आहे कांहीं.

**हरि० :** अच्छा, येतों ग. येतों हां बापूराव.

**यशोदा :** कुठं बाहेर खाऊं नकोस हं.

**हरि० :** ओ. के. ( जातो )

**यशोदा :** बासूच्या फीची झाली का कांहीं व्यवस्था ? काय म्हणाले नानासाहेब सराफ ? बासूची तार येऊन दोन दिवस झाले. फी वेळेवर नाहीं भरली तर पोराचं वर्ष फुकट जाईल.

**बापू० :** या तुझ्या पाटल्या चार तोळ्याच्या भरल्या. वरचा सोन्याचा पत्रा एक तोळाभरहि भरणार नाहीं असं ते म्हणाले. खूप विनवणी केली तेव्हा साठ रुपये द्यायला ते तयार झाले.

**यशोदा :** साठ ! बासूला सत्तर हवे होते ! साठ तर साठ ! मोडून टाका त्या पाटल्या. अन् तारेनं त्याला पैसे धाडा. कसंहि होईल आपलं—पण त्याचं हें वर्ष बुडायला नको वेळेवर फी भरतां आली नाहीं म्हणून.

**बापू० :** केव्हां संपणार आहे हा काळोख यशोदा ?

**यशोदा :** न का संपेना ! देव्हाऱ्यांतल्या देवापुढं माझी फुलवात जळते आहे तोंवर या काळोखाला भ्यायचं काय कारण ? जा, मोडा तो दागिना.

**बापू० :** पण यशोदा, हें असं मी केलं तर सुलू काय म्हणेल मला ? मामा काय म्हणतील ?

**यशोदा :** आपण आपल्या सत्तेचं मोडतो आहोत. कुणापुढं हात तर पसरत नाहीं आम्ही ? कुणी बोललंच तर मी खंबीर आहे उत्तर द्यायला. थांबा. ( चहाचा कप आणून देते. )

**बापू० :** मला एवढा नको. तुम्ही घेतां का थोडासा माझ्याबरोबर. ( बापूराव जड पावलानं जातात. जराशानं मामा येतो. )

**हरि० :** सच्चिदानंद.

**यशोदा :** अरे, तूं आलास जाऊन.

**हरि० :** अग त्या चौकांत गेलों नि आठवण झाली. आमची ही माळ राहिली रुद्राक्षाची. अशी लकी आहे माळ—अक्का. ही घातल्यापासून ए वन् बिझिनेस. हसतेस काय ? बारामुखी रुद्राक्ष आहे हा ! बापूरावांना कुठाळलंस ?—बरं हें बघ—हे ठेव तुझ्याजवळ, वीस रुपये. तुझ्याकडनं मागं एकदां मी घेतले होते.

**यशोदा :** मला नाहीं आठवत.

---

**शेजाऱ्या, रात्र तुझी आहे !**

• • • मेली अंधारी रात्र मोठी दुष्ट आहे. पति प्रवासाला गेले आहेत. घरांत मी एकटीच आहे. म्हणून म्हणतें, शेजाऱ्या, जागा रहा, म्हणजे आपल्या घरीं चोरी होणार नाहीं.

— **गाथासप्तशती** ४.३५

---

**हरि० :** अग पंधरावीस वर्षे झालीं त्याला. मला पक्कं आठवतं—मघाशीं डायरी चाळली—

**यशोदा :** समजलं. ठेव तुझ्याकडं. लागले तर घेईन तुझ्याकडनं.

**हरि० :** घे म्हणतो ना—माझी शपथ आहे.

[ याच वेळीं सुलू एका आवेगानं येते. पाळण्यांत बेबीला झोपवून बाहेर येते. ]

**सुलू :** आई, तुम्ही माझ्यापासून ही गोष्ट लपवून ठेवलीत ! का—कशासाठीं—लपवून ठेवलीत ? किती दुष्ट निर्दय दगड आहात तुम्ही !

**हरि० :** काय झालं सुले ?

**सुलू :** मामा, बेबीचा हा ताप साधा नाहीं—तो टॉयफाइड आहे.

**हरि० :** टॉयफाइड ?

**सुलू० :** होय टॉयफाइड ! डॉक्टर देसाई म्हणाले. आई, त्यांनीं तुला आठ दिवसांपूर्वीं सांगितलं नव्हतं हें ? नीट औषधपाणी केलं नाहींत तर पोर हातची निसटून जाईल ! खरं ना हें ? आज अठरा दिवस झाले, तें दीड वर्षाचं कोवळं पोर एकशेतीन तापानं पाळण्यांत तडफडत पडलं आहे, नि तुम्हांला कांहीं वाटलं नाहीं त्याचं ! महिन्यांनीं मी आज घरीं येते आहे, मला तरी कळवायचं ! कसलं कठोर अन्तःकरण आहे तुमचं ! त्या पोरीला औषध द्यायला तुमच्याजवळ पैसा नव्हता तर ..तर भीक का मागितली नाहींत कुणाच्या दारांत जाऊन ! आई बाप इतके निष्ठुर असूं शकतात याची आज मला कल्पना आली ! तें पोर पाळण्यांत एकेक तास मोजीत पडलं आहे, श्वास देखील त्याला नीट घेतां येत नाहीं नि तुम्ही त्याला म्युनिसिपालटीच्या दवाखान्यांतलं लालपाणी पाजीत राहिलात ! काय म्हणावे तुम्हांला ! मामा, तुझ्याजवळचे थोडेसे पैसे आम्हाला कर्ज म्हणून दे—ही चिठ्ठी घे—नि हें औषध ताबडतोब घेऊन ये. डॉक्टरनी एक इंजेक्शन दिलंय—पण बेबीनं तिथंच डोळे फिरवले नि मान टाकली. डॉक्टर येतील आतां—तूं हें एवढं औषध आण लौकर—वाऱ्यासारखा धाव नि ताबडतोब ये.

**हरि० :** अक्का, मी आहे तुझ्याजवळ. तूं काय घाबरतेस अशी—आलोच मी. ( जातो )

**यशोदा :** ( पाळण्याच्या खोलींतून हुंदका येतो ) बेबी ऽऽ बबड्या—माझ्या राजा—सुलू ऽऽ अग लौकर ये—बेबी बघ कसं करते आहे-बेबी-बबड्या—

**सुलू :** ( आंत धावते ) आई —( किंचाळते ) बेबी ऽऽ बेबी ऽऽ

( इतक्यांत बापूराव आनंदानं धांवत येतात )

**बापू० :** यशोदा, मला ऐंशी रुपये मिळाले ! आतां बासूच्या फीची काळजी दूर झाली ! यशोदा, ऐंशी रुपये मिळाले—सुलू—ऐंशी रुपये आहेत हे......

**सुलू :** ( बाहेर येते नि बापूंना मिठी मारते ) बापू ऽऽ, बेबी—

**बापू० :** काय—बेबी गेली ?

( हातांतल्या ऐंशी रुपयाच्या नोटा खालीं पडतात— )

* * *





काळजीसुद्धां माणसांप्रमाणें लाडावणारी आहे.
तिचे जितके लाड करावे तितकी ती डोक्यावर बसते.
नको असतांना येणाऱ्या कोडग्या संकटांकडे जर
आपण लक्षच दिलें नाहीं, तिऱ्हाईतपणानें पाहिलें तर तीं आलीं
केव्हां आणि गेलीं केव्हां हेंही समजत नाहीं...

# काळजी



सौ. वसुंधरा पटवर्धन

फार पूर्वीपासूनच प्रत्येक गोष्टीची काळजी करण्याची मला खोड आहे. इतकी काळजी करायची कीं काळवंडून जायचें. घरांतलें माणूस वेळच्या-वेळीं घरीं आलें नाहीं तर चिंतेनें माझा जीव उडून जायचा. तो वाट चुकला असेल ? कीं त्याला अपघात झाला असेल ? कीं त्याला कोणी फसवून भलत्याच ठिकाणी नेऊन त्याचा घातपात केला असेल ? अशा अनेक गोष्टी त्या केवळ पांच मिनिटांत माझ्या मनांत यायच्या. येणाराला पांचच मिनिटें उशीर झालेला असायचा. पण काळजी करून मी त्याच्यावर व पर्यायानें माझ्यावर अनेक काल्पनिक संकटपरंपरा ओढवून घ्यायची. चार माणसें जेवायला यायची असली तर जेवायला काय काय करायचें हें दिवसाकाठीं एक हजार वेळां तरी मी मनाशीं घोकायची. अळूची भाजी, बटाट्याची भाजी, श्रीखंडपुरी, अमुक आणि तमुक, असें एकदां मनाशीं म्हणून झालें तरी तेच पदार्थ मी पुन्हां पुन्हां म्हणत रहायची. पाट कुठें मांडायचे, रांगोळी कशी काढायची, न विसरतां उदबत्त्या कशा लावायच्या, याची तालीम माझ्या मनांत सारखी व्हायची. मला मुळीं दुसरें कांहीं सुचायचेंच नाहीं. तें जेवण एकदां होऊन जाईपर्यंत माझ्या जीवाला चैन म्हणून पडायची नाहीं. आणि हातून दुसरें कांहीं व्हायचं नाहीं. काळजी करणें याचाच अर्थ तीच ती गोष्ट निरर्थकपणें पुन्हां पुन्हां उगाळणें ! मंत्रचळेपणा करणें ! दाराला कुलूप लावलें तरी पुन्हां पुन्हां ओढून पहायचें. एकदां दोनदां पहावें हें ठीक आहे. पण अति काळजीमुळें मनुष्य फार, घोटाळ्यांत पडतो. पायांतपाय घोटाळून त्याचा पाय पुढें म्हणून पडत नाहीं. किंवा पुढें जायला त्याला फार वेळ लागतो. दाराचें कुलूप दहा वेळां ओढून पाहिलें तरी अति काळजी करणाराचें तेवढ्यानें समाधान कधींच होत नाहीं. चार जिने उतरुन तो खालीं गेला असला तरी त्याला शंका येते. तो पुन्हां ते सगळे जिने चढून येतो. कुलूप हलवून पहातो आणि मग त्याची खात्री पटते. खात्री पटायला त्याला एवढा वेळ लागतो. हा सारा मंत्रचळेपणा मी कित्येक वर्षं केला आहे.

असें करण्यांत फार वेळ जातो. आणि मनःस्ताप होतो तो वेगळाच. घरांत कार्य निघालें तर दिवसच्या दिवस, आठवडेच्या आठवडे मला सारखें तेंच दिसतें. आतां हें करायचें. मग तें करायचें. याला बोलवायचें. हें ध्यानांत ठेवायचें. असें करण्यांत दुसरें कांहीं सुचत नाहीं. स्वप्नेंसुद्धां तीच पडतात. मग इतकें बावरायला होतें कीं हा एवढा पसारा मांडला तरी कशाला, असा पश्चात्ताप होऊं लागतो. हें बोलेजंग कार्य करण्याची दुर्बुद्धी आपल्याला कशाला सुचली असा माझा मीच बोल लाऊन घेते. आणि मनाशीं शपथ घेते कीं या उपद्व्यापांत पुन्हां पडायचें नाहीं. पण तें कार्य पार पडेपर्यंत माझें अन्नपाणी तुटतें. झोप उडते.

गांवाला जायचें असलें तरीहि मला असेंच वाटतें, कीं कसें होईल ? प्रवासांत कसें होईल आणि गांवीं पोचल्यावर तरी कसें होईल ? कामाला मनुष्य मिळेल का ? हवापाणी कसें असेल ? मुलें आजारी पडली तर काय करायचं ? डॉक्टर मिळाला तरी कितपत मिळेल ? अशा अनेक शंकांनीं मी हैराण व्हायची. त्याच त्या शंका पुन्हां पुन्हां घ्यायच्या आणि डोकें अगदीं सुन्न करून सोडायचें. मग असें वाटे, कीं तें गांवीं जाणें नको. आणि त्या शंका नकोत.

पण यामुळें एवढेंच व्हायचें कीं माझा पाय कधीं घरांतून निघायचा नाहीं. बरें, घरांत बसून तरी सुख आहे असें थोडेंच आहे ? कुठेंहि गेलें वा न गेले तरी पळसाला पानें तीनच. स्वभावच तो. कां ग बाई रोड, तर साऱ्या गांवाची ओढ !

एकच विचार अगदीं तुटून जाईपर्यंत मनांत घोळवला, म्हणजे माणसाला विलक्षण त्रास होतो. विनाकारण होतो. एखादें पत्र जरी मीं कोणाला टाकलें असलें तरी माझें विचारचक्र सुरूं व्हायचें. आज पत्र पेटींत टाकलें. उद्यां तें गाडीनें जाईल. मग परवां तें त्या

अनुक्रमणिका

माणसाला मिळेल. मग तो केव्हां उत्तर लिहील ? टपालांत केव्हां पडेल ? आपल्याला केव्हां मिळेल ? इतका तपशीलवार विचार करण्याचें वास्तविक मला कांहींहि कारण नसायचें. पण स्वभावाची ठेवणच अशी होती कीं हें सगळें माझ्या मनांत यायचेंच. घोळायचेंच आणि त्रास व्हायचाच.

जशीं कांहीं सगळीं उत्तरें नसलेलीं कोडीं ! अनुत्तरीत प्रश्न ! शेवट नसलेला रस्ता ! सगळ्या गोष्टींचें ओझें केवळ आपल्या शिरावर ! बरें हें ओझें घेऊन मी कांहीं विशेष करत होतें असें नाहीं. त्यावेळीं सगळीं माणसें जें करतात, तेंच मी करायची अधिक करण्याची. गोष्ट म्हणजे काळजी ! चिंता ! या काळजीचा असा एक अंगभूत गुण आहे कीं जी गोष्ट जेवढी असेल, त्याच्या दसपट दिसते. काळजी करणाऱ्या माणसाला कोणत्याहि गोष्टीचें भयच फार वाटते. अती काळजी वाटणें याचाच अर्थ घाबरून जाणें. मग ती दसपट वाटणारी काळजी दसपट भय दाखवते; आणि आपली शक्ति विनाकारण खाते. आपला वेळहि दसपट घेते. खरें पहातां पुष्कळशा गोष्टी जशा व्हायच्या, तशाच होत असतात. पुढें काय होणार हें तसें म्हटलें तर आपल्या हातीं नसतें. एखादी गोष्ट व्यवस्थित काळजीपूर्वक करणें एवढेंच आपल्या हातीं असते. काळजी न करणारा मनुष्य हें एवढेंच करतो आणि मोकळा होतो ! लगेच दुसऱ्या कामाला लागतो. थोडाच वेळ चिंता करून जणुं कांहीं त्याचें समाधान होतें. काळजी करणारा मनुष्य मात्र या काळजींतून कधींच मुक्त होत नाहीं. निदान दुसरी एखादी गोष्ट काळजी करायला मिळेपर्यंत तो पहिली काळजी सोडत नाहीं.

कोणत्याहि गोष्टीला शेवट असावा लागतो. विनशेवटाची काळजी ही अखेर अनर्थाला कारणीभूत होते. रेशनचे दिवस होते. एक आठवड्याला धान्य तोलून मिळायचें. त्यामुळें तें आणूनच खावें लागे. पण सर्वच माणसें कांहीं तोलून आणलेल्या धान्यावर अवलंबून नव्हती. धान्य चोरून आणावें आणि चापून खावें असें पुष्कळांनीं चालविलें होतें. पण एक मनुष्य होता. तो भारी प्रामाणिक होता. प्रामाणिकपणेंच तो एखाद्या गोष्टीची काळजी करायचा. बायकोनें रेशन-दुकानांत तोलून आणलेल्या धान्याविषयींच याला शंका यायची. मग तें तोलून आणलेलें धान्यच तो बायकोला पुन्हां तोलायला लावायचा. त्यांतलें रोज किती घ्यायचें, याचा हिशेब करायचा. त्याप्रमाणें रोज तोलून द्यायचा. पण एवढ्यानें त्याचें समाधान होत नसे. एक दिवसाचें धान्य तोलून दिल्यावर सहा दिवसांचें शिल्लक असलें पाहिजे. यावर त्याचा कधीं विश्वास बसायचा नाहीं. मग तें सहा दिवसांचें धान्य, सहा निरनिराळे वाटे करून तोलून ठेवायचें, तेव्हांच त्याचा जीव भांड्यांत पडायचा.

पण काळजी करणाराचा जीव असा भांड्यांत पडण्यासाठीं असतो थोडाच ? तो जीव असतो खालींवर होण्यासाठीं ! या आठवड्याची व्यवस्था झाली. पण पुढल्या ? धान्य दुकानांत आठवडा सहा दिवसांनी ! पण विवंचना मात्र याच आठवड्यापासून सुरू ! ! काळजी हा असा रोग आहे कीं माणसाचें मन पोखरतो. आणि अतीरेक झाला कीं शरीरसुद्धां पोखरतो. काळजीचा भुंगा एकदां सुरू झाला कीं माणसाला चैन पडूं देत नाहीं. या धान्य तोलणाऱ्या माणसाला काय एवढीच काळजी होती ? सहज पडल्या पडल्या तो आढ्याकडे बघायचा. आणि त्याला वाटायचें कीं, एक दिवस या आढ्याला वाळवी लागणार. मग तें पोखरलें जाणार. आणि एक दिवस तुटून तें आपल्या डोक्यांत पडणार ! त्याची ही कल्पना इतकी दृढ झाली कीं त्याला त्या आढ्याखालीं कांहीं सुखानें झोप यायची नाहीं. रात्रभर दचकून जागें व्हायचें. आणि रात्रभर खाट इकडून तिकडे सरकवायची. आत्यंतिक काळजी करणारा माणूस आणि वेडा यांत फारसें अंतर राहूं नये, इतपत खुळसटपणाच्या आणि हास्यास्पद कृति त्याच्या हातून होऊं लागतात.

अतीरेकी काळजीनें मनुष्य दुबळा होतो यांत कांहीं शंका नाहीं. हा वर सांगितलेला मनुष्य अखेर कंपवायूनें आजारी झाला. अष्टौ-प्रहर त्याचे हातपाय कांपूं लागले. हळूहळू सगळें अंगच कापूं लागलें. मान लटलट हलूं लागली. थोडक्यांत म्हणजे तो परावलंबी झाला. आणि त्यांतच त्याचा अंत झाला.

एखादी गोष्ट काळजीपूर्वक करणें निराळें. आणि त्या गोष्टीची काळजी करणें निराळें. आपल्या सुरक्षिततेसाठींच काळजी करायची असते याचें भान काळजी करणाराला मुळींच रहात नाहीं आणि काळजीसाठीं काळजी सुरू होते. त्याच्यासाठीं काळजी रहात नाहीं तर काळजीसाठीं तो खर्ची पडूं लागतो. कोणी हें सांगितलें तरी तें त्याला पटत नाहीं. आत्यंतिक काळजी करणें हा दुर्गूण नसून सद्‌गुण आहे असेंच त्याला वाटतें. इतर काळजी न करणारीं माणसें केवळ बेजबाबदार आहेत असेंच त्याचें मत असतें. बेजबाबदार माणसें नसतात असें मला म्हणायचें नाहीं. पण विनाकारण काळजी करून थकून जावें, डोळ्याखालीं काळीं वर्तुळें क्षणार्धांत उमटावींत हें कांहीं खरोखर चांगलें नाहीं. माणसानें सावध असावें पण काळजीनें मरून मात्र जाऊं नये. माझी एक मैत्रीण आहे. अंतःकरणाची फार हळवी आहे. कोणाची ना कोणाची ती सतत काळजी करत असते. मला वाटतें, एखाद्या दिवशीं तिला जर काळजी करायला मिळाली नाहीं तर ती बेचैन होईल. पण खरें पहातां, तिच्या या काळजीचा तसा कांहींच उपयोग नसतो. कोणी आजारी झालें तर त्याला चटकन् औषधपाणी न करतां, ती त्याची नुसती काळजीच करीत बसते. या नुसत्या काळजीचा आणि ही काळजी करणाऱ्या माणसाचा खरोखर काय उपयोग आहे ?

बाबूरावांनीं जन्मभर सगळ्यांची काळजी घेतली. वास्तविक स्वतःची काळजी कधींच केली नाहीं. पण या साठ वर्षांच्या अवधींत त्यांनी आत्यंतिक काळजी करण्याची संवय लावून घेतली. आतां साऱ्यांचे सारें कांहीं करून झालें व वयहि झालें. आतां ते स्वतःची काळजी करतात. काळजी जरूर केली पाहिजे. तें बरोबरच आहे. पण एका अर्थी बरोबर नाहींसुद्धां. काळजी-पूर्वक वागावें हें उचित आहे. पण घाबरून जावें हें मात्र फार घातक आहे. आत्यंतिक काळजी माणसाला संशयात्मा बनविते. बाबूराव काळजी करून गप्प बसत नाहींत. त्यांना सारख्या शंका येतात. त्याचा परिणाम असा होतो कीं प्रकृति बरी असली तरी बिघडण्याची शंका येते. बाबूराव जेव्हां अंगानें चांगले होते, तेव्हां त्यांना वाटायचें कीं आपण रोड झालें पाहिजे. काळजी



अनुक्रमणिका

करूंन आणि शंका घेऊन घेऊन ते पुढें आपसूकच रोड झाले; तर त्यांना वाटूं लागलें कीं आतां आपण जरा लठ्ठ झालें पाहिजे. नाहीं तर आपण अशक्त होऊं, व थकत जाऊं आणि एक दिवस अंथरुणावर पडूं. मग कसलें आपण उठतो ? आधींच वय झालेलें त्यांत अशक्तपणा. आणि अंथरुण. मग राहिलें काय ? एक दिवस कांहीं तरी व्हायचें आणि आपण गचकायचें. बापरे ! आपण मरूं या कल्पनेनेंच ते हैराण झाले. आणि तेव्हांपासून त्यांना आपल्या मरणाविषयींच काळजी वाटूं लागली. रोज केवळ शंकेनेंच त्यांना कांहीं तरी होतें आणि मरण जवळ आलें असें वाटतें. खरें म्हणजे मरण जेव्हां यायचें असेल तेव्हांच येणार. तें आलेलें बाबूरावांना कळेल अथवा कळणार सुद्धां नाहीं. मग आधींपासून त्याची काळजी करून काय होणार ? किंवा मरणाची काळजी करायची म्हणजे तरी खरोखरी काय करायचें ? पण काळजी करणारा मनुष्य नक्कीच कांहीं तरी प्रचंड प्रमाणांत करीत असतो. कल्पना ! शंका ! भय ! त्यानेंच तो दुबळा होतो. भित्रा होतो. आणि जीवंतपणीं मरणाच्या यातना भोगतो.

यापेक्षां काळजी न करणेंच उत्तम असते. अशा माणसाची प्रत्येक घडी त्याची असते. भय आणि शंका यांपासून तो मुक्त असतो. अशी म्हण आहे कीं चिंतन करावें पण चिंता करूं नये. पैसा कसा मिळवावा व राखावा याविषयीं चिंतन करावें. व त्याप्रमाणें ते विचार अमलांत आणावेत. पण चिंता मात्र मुळींच करूं नये. चिंता केली कीं मनुष्य निम्मा खल्लास होतो. मी असें पाहिलें आहे कीं काळजी न करणाऱ्या माणसाचें एकंदरींत कांहीं अडत नाहीं. आत्यंतिक काळजी करणाराचें मात्र कांहीं ना कांहीं विनसत असतें. माझी एक मैत्रीण आहे, ती म्हणते, पैसा आला कीं आधीं खर्च करावा. म्हणजे लगेच दुसरा मिळतो. आपण सामान्य माणसें फार मोठ्या गोष्टी करूं शकत नाहीं. पण मोठ्या माणसांच्या मोठ्या गोष्टी आपल्याला जरूर मार्गदर्शक ठरतात. चर्चीलला एकदां केव्हां तरी म्हणें फार मानसिक त्रास झाला. त्याची झोप उडाली. आणि त्यामुळें तो अगदीं त्रासून गेला. पण मग त्यानेंच एक युक्ती शोधून काढली. रात्रीं निजतांना तो खोलीच्या दाराशीं क्षणभर उभा राही. आणि खांद्यावरचें ओझें फेकून द्यावें त्याप्रमाणें मनांतलें विचार तो दाराबाहेर फेकून देई. आणि मग खाडकन दरवाजा लाऊन तो बिछान्यावर धाडकन पडे. आश्चर्य असें कीं चार दोन क्षणांनीं त्याला गाढ झोप लागे. त्या चार दोन क्षणांत त्यानें पहाटें किती वाजतां उठावयाचें एवढाच विचार केलेला असे. आणि तसा तो अचुक उठे.

आपल्याकडील एका गाजलेल्या वर्तमानपत्रकाराची अशी गोष्ट सांगतात कीं एकदां एक फार मोठा व्यवहार त्यांच्या अंगाशीं आला. चांगला चार सहा लाखांचा फटका बसला. इतर अनेक बाजूंनीं त्राही भगवान् झालें. धरणी दुभंग होऊन पोटांत घेईल तर बरें असें वाटण्याची वेळ आली. पण या बहादुर माणसास तसें वाटलें मात्र नाहीं. यांतून कांहीं तरी वाट काढावी म्हणून हा गृहस्थ आपल्या एका मित्राकडे गेला. तो मित्र कांहीं महत्वाच्या कामांत गुंतला होता. तो म्हणाला, " तूं एक तास अर्धातास थांब. मी काम आटपून आलों."

तेव्हां या वर्तमानपत्रकारानें तिथलेच कांहीं कागद घेतले. एक पेन्सील घेतली. आणि जमीनीवर पालथें पडून एक सुंदर अग्रलेख लिहून काढला. हा अग्रलेख लिहून होईपर्यंत त्यानें आपली ती त्राही भगवान् परिस्थिती बाजूला ठेवली. एखादी वस्तू उचलून ठेवावी तशी.

माझे एक नातलग आहेत. त्यांनी आजपर्यंत पुष्कळ विपरीत परिस्थितींतून डोकें वर काढलें आहे. तरीसुद्धां त्यांच्यापुढें नेहमीं कसल्या ना कसल्या समस्या " आ " पसरून उभ्याच असतात. विशेष म्हणजे खर्चीक स्वभावामुळें पैशाचा यक्ष प्रश्न कायमचाच असतो. पण हे वीर गृहस्थ सगळ्या प्रश्नांची जरूर तेवढी काळजी करून नंतर त्याची थट्टा उडवून देतात. विशेषतः जेव्हां एखादी गोष्ट फार वेळ गंभीर आणि करुण होऊन बसते, व त्यावर कांहींच उपाय नसतो, तेव्हां ते म्हणतात, " पुरे झालं कौतुक. झोपा आतां. नाहीं तर बाहेरच जायला लागा.—" ते स्वतः तसेंच करतात. जणुं त्यांच्या मनांत अनेक कप्पे आहेत. त्यांतल्या कोणत्या तरी एका कप्प्यांत ते काळजी ठेऊन देतात. आणि दोन किल्यांचें कुलूप लाऊन टाकतात.

काळजीसुद्धां माणसांप्रमाणें लाडावणारी आहे. तिचे जितके लाड करावेत तितकी ती डोक्यावर बसते. नव्हे, जितकें तिचें कौतुक करावे तेवढी ती डोक्यांतच शिरते. आणि तिथून मग तिला मनांत हृदयांत आणि सगळ्या शरीरभर पसरायला वेळ लागत नाहीं. शरीरांतून जसें रक्त वहात असतें, तशी रक्तांतून मग काळजी वाहूं लागते. काळजीला दारांत एक वेळ उभें राहूं द्यावें. पण तिला घरांत घेतां उपयोगी नाहीं. तिथूनच तिला बाहेरच्या बाहेर हाकून लावलें पाहिजे. धरांत घेण्याची या बयेची लायकी नाहीं. ती मनःस्ताप मात्र वाढवते. वातावरण बिघडवते. सतत काळजी करणाऱ्या माणसाचा चेहरा कधीं प्रसन्न असणें शक्य नाहीं. त्याला सदा आभाळ लटकून आल्यासारखें वाटतें.

पण हें ज्याला समजेल त्याच्या हेंहि ध्यानांत येतें कीं, कोणत्याहि गोष्टीची कांहीं एका मर्यादेपर्यंत काळजी वाटणें योग्य असते, आणि इष्टहि असते. पण त्यानंतर मात्र कोणतीहि मोठी गोष्टसुद्धां फार काळजी करण्यासारखी नसते. पुष्कळसे

आला, आला, संयुक्त महाराष्ट्र आला !!



अखेर 'भामिनी' पळविली.







अनुक्रमणिका



# पहांटेच्या अभ्राखालीं

पहांटेच्या अभ्राखालीं
पंखपंख जागे झाले

जाणीवेच्या नेणीवेच्या
पैलतिरीं प्राण गेले

पीस वाऱ्याचें सुगंधी
तरळलें हळुवार

भिजलेल्या मातीवर
गूढ वेदनेचा भार

अंधारींच्या अंधारांत
फिकी छटा प्रकाशाची

श्वास घेतात जपून
पानें पेंगली माडाची

सारे कोषांत धुक्याच्या
मूक पडले निवान्त

आभाळाला अर्धी जाग
तरी माती शान्त शान्त

जाणीवेच्या नेणीवेच्या
पैलतिरीं प्राण जरी

प्राणामधें जागें आहे
फिकें फिकें कांहीं तरी !

—पद्मा लोकूर

प्रसंग हे थोडी कळ सोसण्याचे असतात. कित्येकदां माणसाला बरेंच सोसावें लागते. पण हें काळजी न करतां जर त्यानें सोसलें तर मनुष्य बचावतो. आकाशांतून ढग जावेत तितक्या दुरून आपलें संकट निघून जातें. धरणी दुभंग होऊन पोटांत घेईल तर बरें असें वाटण्याच्या वेळींच जर धरणीवर पाय घट्ट रोवून उभें राहिलें तर धरणीहि दुभंग होत नाहीं व आकाशहि फाटत नाहीं. धरणी व आकाश जागच्या जागीं राहून आपणहि व्यवस्थित जागीं उभे असल्याचा अनुभव येतो. कांहीं कांहीं संकटें हीं टाळतां येण्यासारखीं नसतातच. ती येतातच व आपल्याला भोगावीहि लागतात. पण ह्या नको असतांना येणाऱ्या कोडग्या संकटांकडे जर आपण लक्षच दिलें नाहीं, व तिऱ्हाईतपणें पहात राहिलें तर पुष्कळदां तीं आली केव्हां व गेलीं केव्हां हेंहि समजत नाहीं. निदान ती आपल्याला विशिष्ट अर्थानें भोगावीं लागत नाहींत. न भोगतांच तीं परस्पर निघून जातात. अगदीं जवळून जातात पण स्पर्श करीत नाहींत. स्पर्श झालाच तरी चिमटा बसत नाहीं.

निरर्थक व किरकोळ चिंता करणें हा केवळ मूर्खपणा आहे असें मी आतां अनुभवाअंतीं ठरविलें आहे. केवळ विचार आणि विचार करून माथें भडकविण्यापलिकडे आपण कांहींहि करत नाहीं. सटरफटर गोष्टींचें तर सोडूनच द्या. पण मोठ्या गोष्टींतसुद्धां चिंतन उपयोगी पडते. चिंता घात करते. ही मोठी गोष्टसुद्धां होऊन गेल्यावर, आपण समजत होतो तेवढी मोठी नव्हती असें वाटूं लागतें. कोणतेंहि संकट स्वतःपेक्षां मोठें ठरूं देण्यांत आपला घात असतो. या उलट त्या संकटापेक्षां आपण मोठे राहिलो, तर कुत्रीं भुंकावीत आणि हत्तीनें वळूनसुद्धां पाहूं नये असा प्रभाव होतो. संकटें हीं कावळ्याचे शाप समजावेत व ते कावळे हाकलून लावावेत. असें कोणतें संकट आहे कीं ज्याला शेवट नाहीं? एखादें अगदीं दुर्दैवी मनुष्य असते आणि त्याची संकट परंपरा कांहीं केल्या संपत नाहीं. अशा माणसांच्या दुर्दैवाविषयीं मी कांहीं म्हणूं शकत नाहीं. पण सर्वसाधारणपणें संकटें माणसांच्यापेक्षां लहानच असतात असें दिसून येईल. शेवटीं हें सुद्धां मानण्यावरच आहे. आयुष्यच मुळीं जसें कांहीं बरें वाईट असेल तसेंच मानून घ्यावें लागते. तिथें आयुष्यांत येणाऱ्या संकटाचें काय? पुष्कळदां आपण संकटांना अवास्तव महत्व देऊन मोठे करतो. कै. लक्ष्मीबाई टिळकांनी स्मृतीचित्रांत लिहिलें आहे कीं "टिळकांच्या सहवासांत संकट केरकचऱ्यासारखे उडून जायचें आणि वातावरण लगेच निवळायचें." याचाच अर्थ माणसें मोठी असतात आणि त्यांनीं अडचणींना लहान केलेलें असते. त्यामुळें आपला बचाव होतो. आपण सुरक्षित रहातों. आणि आपल्याला तरी दुसरें काय हवें असतं?

• ६ •

**अंजलि**

७ ६ ७ मुला, सूर्याच्या निमित्तानें तूं कोणाचें ध्यान करीत आहेस, कोणाला अंजलि अर्पण करीत आहेस? सस्मित मुलानें व काण्या नजरेनें देवाचा जयजयकार करावयाचा नसतो.

— गाथासप्तशती ४·३२





मराठी कथेवर वि. सी. गुर्जरांचें फार मोठें ऋण आहे. घटनाप्रधान कथांच्या जमान्यांत गुर्जरांनीं मराठी कथेला लोकप्रिय बनविलें आणि वाळये आणलें. त्यामुळें जुन्या जमान्यांतल्या या ज्येष्ठ लेखकाची कथा वाचकांना रुचिपालट म्हणून खात्रीनें आवडेल———



# प्युरिटन्

——वि. सी. गुर्जर

**'ऋतूंमध्यें हा पहिला वसंत**
**वाटे जनांना बहुधा पसंत !'**

रावबहादुर श्रीपतराव ऊर्फ नानासाहेब पांडव यांच्या, सुंदर अलिशान बंगल्या-वरून जातांना कुणी वाटसरू आपल्या भसाड्या आवाजानं हा जुना श्लोकार्ध मजेनं गातगात चालला होता.

खरं होतं त्याचं या चालू ऋतूसंबंधानं वर्णन. ऋतूमध्यें 'पहिला' अन् सर्व जनांना अनेक रीतीनीं 'पसंत' असलेला वसंत ऋतु मूर्त अवतरलेला दिसत होता खरा ! ऋतुश्रेष्ठ वसंताचं मधुर आगमन झालं आहे असं सांगणारा निळ्या आकाशाचा दृश्य भाग अगदीं निर्मल अन् मेघशून्य दिसत होता. आजूबाजूंच्या प्रत्येक बंगल्या-समोरच्या छोट्यामोठ्या बागबगीच्यांत जीं झाडं अन् वेली होत्या, त्यांवर नवीन लालसर पत्रपल्लव अन् फुलं लटकत होतीं. तें पुण्या-सारखं मोठं शहर होतं म्हणून—नाहींतर कोकिळेचा 'कुहू कुहू' असा पंचमस्वर या वेळीं आला असता ! सारांश पृथ्वीतलावर आनंदाला भरती आली असून सर्वांच्या मनांत वसंत आगमनामुळं थोडाबहुत उधृत रम्यतेचा उल्लास खेळूं लागला होता.







आमचे कथानायक रावबहादुर नानासाहेब पांडव कांहीं या वस्तुस्थितीला अपवाद नव्हते !

जरा वयानं नानासाहेब प्रौढपणाच्या पलीकडील मर्यादेपर्यंत पोंचलें होते अन् वयोमानामुळं शरीरानं कांहींसे पंगुहि बनले होते, तरी तरुण वाचक-वाचकांनीं हताश व्हायचं कांहीं कारण नाहीं ! कारण, रोमान्स ही कांहीं तरुण-तरुणींच्या एकमेव मक्त्याची मनोभावना नाहीं. उत्तम संधि अन् चांगला योगायोग प्राप्त झाल्यावर सर्व लहान-थोर स्त्री-पुरुषांवर तें बळकट रीतीनं प्रभाव गाजवूं शकतं. विशेषकरून वसंतासारखा ऋतुराज जेव्हां त्यांना साहाय्य करतो, तेव्हां !

\+ + +

रावबहादुर नानासाहेब पांडव हे अलीकडे तीन चार वर्षं दारुण विधुरावस्थेंत आयुष्य कंठीत होते. मूळचेच तें गर्भश्रीमंत. मावळ तालुक्यांत त्यांची जमीनजुमला अन् शेतीभाती बरीच असून त्यांनी पूर्ववयांत मोठी पगारदार सरकारी नोकरीही केली होती. पुण्यास रावबहादुरांचा टुमदार बंगला असून त्यासमोर बागबगीचाही सुंदर होता. त्यांची एकुलती एक मुलगी मीनाक्षी कॉलेजमध्यें बी. एस्‌सी. च्या वर्गांत होती. रावबहादुरांच्या बंगल्यांत गडी-माळी वगैरे किरकोळ दोन चार नोकरांखेरीज, जुना हरकामी नोकर बजाबा शिंदे अन् नवीनच ठेवलेली आया शारदा देशपांडे एवढी जादा मंडळी होती.

पैकीं शारदा ही हैदराबादकडील एक अनाथ स्त्री असून तिला आप्तमित्र कुणी नव्हतं. कांहीं वर्षापूर्वीं हैदराबाद संस्थानांत जेव्हां रझाकारांचा हैदोसदुल्ला जोशांत चालू होता, तेव्हां तिथून मोठ्या मिनतवारीनं ती पळून आली होती. दोनचार ठिकाणीं फुजकी नोकऱ्या केल्यानंतर, रावबहादुरांनीं वर्तमानपत्रांत दिलेल्या जाहिरातीवरून ती त्यांच्या मातृहीन तरुण मुलीच्या दिमतीला परिचारिका म्हणून कांहीं दिवसांपूर्वीच येऊन राहिली होती. मुलीकरतां गृहकर्मनिपुण, शिक्षित अन् विश्वासु परिचारिका पाहिजे असल्याचा जाहिरातींत रावबहादुरांनी स्पष्ट उल्लेख केला होता. अन् ते गुण तिच्या अंगी असल्याची खात्री होऊन त्या निराश्रय प्रौढ स्त्रीला रावबहादुरांनीं आपल्या बंगल्यांत मुलीची परिचारिका म्हणून आश्रय दिला होता.

रावबहादुरांची मुलगी मीनाक्षी ही अतिशय शांत, संयत स्वभावाची असून तिचे आचारविचार सरळ, पवित्र अन् शुद्ध स्वरूपाचे होते. इंग्रजींत ज्या विचारप्रवृत्तीला ' प्युरिटन् ' म्हणतात, अशा प्रवृत्तीची ती होती. कॉलेजांतल्या उडाणटप्पू, भंपक पोरांना ती कधीं नुसत्या इंगितानंही उत्तेजन देत नसे. प्रेमाचं नांव निघतांच मीना दहा हात मागं सरे ! प्रेमाच्या महतीचं पुस्तक कधीं चुकून हातीं आलं, तर ती तें दूर भिरकावून देई ! प्रीतिगीत कानीं येतांच ती एकदम रेडिओ बंद करून टाकी. लग्नाची गोष्ट नानासाहेबांनीं मगर कुणीं कधीं काढतांच मीना तिथून पटकन् काढता पाय घेई. मीना सायन्सची विद्यार्थिनी होती. कॉलेजचे तास संपतांच ती तडक घरीं निघून येई. आपला अभ्यास बरा कीं आपण बरी, असा असे तिचा एकंदर खाक्या ! आपली प्रौढ परिचारिका शारदा हिला मात्र मीना मधुनमधून पुस्तकांतील अन् इतर गोष्टी चांगल्या रंगवून सांगत असे.

रावबहादुर अलीकडे कित्येक वर्षं वातविकारानं अगदी पंगु बनून गेले होते. त्यांना फारसं हालतां चालतांही येत नसे. त्यांचा जुना नोकर बजाबाच त्यांना हवं नको पाही. त्यांची सर्व शुश्रूषा करी. मुलगी चांगली उपवर झाली आहे असं पाहून रावबहादुरांनीं तिला उजवून टाकायचा बराच प्रयत्न केला. परंतु त्यांत यश येत नाहीं असं दिसल्यावर त्यांनीं तो ' नाद ' सोडून दिला असून आपल्या वातविकाराकडेच त्यांनीं आतां सारं लक्ष दिलं होतं. एका प्रख्यात डॉक्टरांचा औषधोपचार त्यांनीं सुरू केला होता. नियमित औषधं अन् सूचिप्रयोग वगैरे साधनांनीं डॉक्टरांनीं रावबहादुरांचा विकार बराच काबूंत आणला असून रोग्याला आतां पुष्कळच आशा वाटूं लागली होती.

\+ + +

फेब्रुआरी महिना संपत आला होता. एके दिवशीं संध्याकाळीं नानासाहेब आपल्या खोलींत आरामखुर्चीवर लवंडले होते. ते एकदम चित्कार करून ओरडले, " बजाबा, ए बजाबा—अरे ए बजा ! गेले कुठं हे सारे ? शरू—"

' शरू ' उर्फ शारदा स्वयंपाकाच्या खोलींत खिचडीसाठीं मुगाची डाळ निवडीत बसली होती. तिनं साहेबांच्या जोरदार हांका ऐकल्या अन् त्वरेनं उठून ती तिकडे धांवली.

तिला पहातांच नानासाहेब त्रस्त स्वरानं म्हणाले, " केव्हांचा हांका मारतोय् मी—हा लेकाचा बजा गेलाय् कुठं ? कुणी ओ देईल तर शपथ ! अन् मी तर इकडे थंडीनं गारठून मरायला टेंकलोय् !"

शारदेनं तातडतोब घाईघाईनं खोलीच्या खिडक्या बंद केल्या अन् पलंगावरील उबदार रग आणून साहेबांच्या पायांवर लपेटीत ती म्हणाली, " रेडिओ आपला बिघडलाय्, तो नीट करायला बजाबाला बरोबर घेऊन मीनाताई गेल्या आहेत रेडिओवाल्याकडे. आपणाला कांहीं आणखीन् हवं असेल तर सांगावं मला—"

नानासाहेब स्वर शक्य तितका नरम करून म्हणाले, " कांहीं नकोय् मला. पण डोकं माझं मघापासून भारीच दुखायला लागलंय्. थोडंसं कुणी जर तें दाबील..."

खुर्चीच्या मागं उभी राहून शारदा साहेबांचं माथं हळुहळू दाबूं लागली. नानासाहेबांनीं आरामानं डोळे मिटले. अन् हात मागं नेऊन शारदेचा हात पटकन् मुठीमध्यें पकडला अन् ते सुखानुभूतीनं उद्गारले, " आः—"

शारदेनं हळूच युक्तीनं आपला हात सोडवून घेतला अन् ती म्हणाली, " मी जातें आतां—बरंच काम पडलंय् सैंपाकघरांत—"

बरोबर याच क्षणीं मीना अन् बजाबा तिथं येऊन ठेपली.

* * *

बजाबा दृष्टीला पडतांच रावबहादूर रागानं एकदम ओरडले, " होतास कुठं रे इतका वेळ, हरामखोरा ? आजारी थेरडा खोकत कोकलत पडला आहे असा एकीकडे—त्याला हवं नको कांहीं पहाशील, का मनमानेल तसा गांवभर भटकत रहाशील ? माझं मोठं नशीब, म्हणून शरू तरी होती घरांत, नाहीं तर घरीं आल्यावर मी मरून पडलोंय्, असंच दिसलं असतं तुला हतभाग्या !"

मीना म्हणाली, " अर्धा पाऊण तास कांहीं अजून झाला नसेल नाना, आम्ही आमचा रेडिओ पलीकडच्या रेडिओच्या दुकानीं






घेऊन गेलं त्याला! अन् एवढ्यांत एवढा मोठा घोटाळा! अन् शरू तरी काय करीत होती? संध्याकाळ झाली तरी दिवेहि नाहीं लावायला झाले तिला? बजाबा, सांगून ठेवतें आज तुला, तूं नानांच्या दिमतीला अगदीं नेहमीं रहायचं आता! कधीं काय जरूर पडेल त्यांना—

× × ×

वडिलांना बजाबाच्या कायम स्वाधीन करून शारदेच्या बाबतींत 'प्यूरिटन्' मीना आतां बरीचशी निष्काळजी झाली होती. शारदेनं स्वतःला सर्वस्वी घरकामाला वाहून घ्यावं अन् तिच्यावर बहुतांशीं मीनाक्षीची देखरेख असावी, असांच सामान्य संकेत त्या दिवसापासून ठरला, असं म्हटलं तरी चालेल. नानासाहेबांच्या परिचर्येला शारदेची गरजच लागूं नये याविषयीं मीना अलिकडे अतिशय दक्ष अन् सावध रहात असे.

परंतु या 'व्यवस्थे'चा परिणाम कांहीं फारसा चांगला झाला नाहीं. अलीकडे बजाबाच्या कामावर नानासाहेब जेव्हां तेव्हां नाखूष होऊन खूप आरडाओरडा करीत अन् त्या इमानी, एकनिष्ठ नोकराला अपशब्दांचं उत्तम बक्षीसही देत!

अन् आश्चर्य हें, कीं एकदोन दिवसांच्या अवकाशांतच पुनः रेडिओचं बस्तान कांहीं तरी बिघडल्याचं मीनाक्षीला आढळून आलं अन् ती एकटीच रेडिओच्या दुकानीं गेली. एके दिवशीं रेडिओ-वाल्याची चांगलीच हजेरी घेतल्याची हकीगत तिनं शारदा अन् नानासाहेब यांना विस्तारानं सांगितली.

दुकानाचा मालक स्वतः उत्कृष्ठ रेडिओ इंजिनिअर होता. तरी त्याला रावबहादुरांचा रेडिओ चांगलासा नीट करतां आला नाहीं, हें मोठं नवल होय! तो वारंवार बिघडूं लागला अन् मीना तो घेऊन अथवा न घेऊनही त्याची खरडपट्टी काढण्याकरतां म्हणून वारंवार त्याच्या दुकानीं जाऊं लागली.

\+ \+ \+

आणखी एक दोन आठवडे गेले. मीना कॉलेजांत गेली होती. नानासाहेब दोनप्रहरची 'डुलकी' घेत पलंगावर पडले होते. हें पाहून बजाबाही आपली वळकटी उलगडून थोडा लेटला होता. शारदा आपल्या खोलींत मीनानं आणलेलं एक मासिक वाचीत पडली होती.

काय झालं कोण जाणे! नानासाहेबांच्या वामकुक्षींत अकस्मात् व्यत्यय आला अन् भलत्याच वेळीं त्यांनीं हांकाहाक सुरू केली.

शारदा धांवत आली अन् तिनं विचारलं, "बजा खालीं झोंपलाय् वाटतं. आणूं बोलावून त्याला?"

"नको—झोंपूं दे बिचाऱ्याला." नानासाहेब छोटासा उसासा टाकून म्हणाले. "कामानं अगदीं दमून जातो सकाळपासून. माझ्या औषधाची वेळ झालीय् वाटतं—म्हणून—"

"औषध, अन् आत्तां?" शारदा जरा आश्चर्यानंच उद्‌गारली. "तीन वाजतां ना औषध घ्यायचं? हा तर वाजतोय पाउण आतां"

"ओः!" साहेब उद्‌गारले. "पाऊणच सारा? माझीच चूक झाली हं! बरं तर, इथं बसून माझं डोकं अंमळ चेपलंस तर बरं होईल. जरा कल्‌कलायला लागलंय् मघांपासून"

अलीकडे रावबहादुरांचं माथं बरंचसं कलकलूं लागत असून रोजच्या या 'प्रोग्राम मध्यें कधीं चूक होत नसे! त्याच्या या माथं कलकलण्यावर रामबाण उपाय म्हणजे शारदेनं तें हलकेंच टिपणं! तीला हें चांगलं माहीत् झालं असल्यामुळें तीही साहेबांच्या हांकेची वाट पहात बसत नसे. साहेबांचं माथं कधीं उसळतं याची तिला चांगली कल्पना असल्यामुळें ती आपण होऊन त्या कामगिरीवर वेळेवर हजर होई.

\+ \+ \+

थंडी संपून हळुहळू उन्हाळा आला. वसन्ताच्या प्रसन्न आगमनांची चिन्हं दिसूं लागली. रावबहादुरांवरही त्यांचा अवश्यंभावी परिणाम झाला. ते आतां बरेचसे व्याधिमुक्त होऊन थोडथोडे हिंडूं फिरूं लागले होते.

त्या दिवशीं दुपारीं दोन वाजले होते. मीना कॉलेजांत गेली होती. रावबहादुर डुलकी घेऊन नुकतेच जागे झाले होते. शारदा जवळच त्यांच्या माथ्यावर नेहमीचा उपचार करीत उभी होती.

रावबहादुर बोलतां बोलतां म्हणाले, "हें पहा शरू ही बातमी ऐकून मीनाला भारी वाईट वाटेल कदाचित्—कदाचित् ती घरांतून निघूनही जाईल माझं तोंड पहाण्यापेक्षां! पण आतां आपण तरी किती दिवस वाट पहायची? अशा चमत्कारिक चक्रम् पोरीचं मन दुखवेल म्हणून आपल्या सुखसर्वस्वावर कायम पाणी सोडायला कोण तयार होणार?"

शारदा आतां नानासाहेबांच्या आरामखुर्चीच्या हाताबर येऊन बसली अन् त्यांच्या माथ्यावरून हळुवार हात फिरवीत म्हणाली, "आपलं लगीन मीनाला मुळींसुद्धां आवडणार नाहीं, हें उघड आहे अगदीं! म्हणून मी म्हणतें, तिचंच लगीन अगोदर उरकून घेतलं तर कसं होईल?"

मान हलवून व्यंगोक्तीनं रावबहादुर उद्गारले, "पोरीचं लग्न झाल्यावर? झालंच मग! अग ती एकरोखी चक्रम् पोर मुळीं लग्नच करणार नाहीं आहे! मोठी शास्त्रज्ञ म्हणजे सायन्समध्यें विदुषी बनून, मादाम क्युरीप्रमाणं एकादा प्रचंड शोध लावून ती जगांत मोठं नांव अन् कीर्ति मिळवणार आहे! तें एक असो म्हणा—पण असल्या शुष्क, नीरस वृत्तीच्या चक्रम् पोरीशीं जन्माची गांठ मारून घ्यायला कोण भाग्यशाली तरुण तयार होणार आहे? तेव्हां माझं म्हणणं असं कीं मीनाच्या मर्जीवर कांहींसुद्धां अवलंबून न ठेवतां आपण आतांच्या आतां रजिस्ट्रारच्या ऑफिसांत जाऊन लग्नाची नोटिस देऊन काम पक्कं करून येऊं या—अग, "शुभं च शीघ्रम्:"

\+ \+ \+

तीनएक वाजले होते. रावबहादुर नानासाहेब पांडव अन् शारदा देशपांडे हें नवं जोडपं टॅक्सींतून मॅरेज रजिस्ट्रारच्या ऑफिससमोर येऊन उतरलं. तीं दोघं दरवाजाशीं जातात, तों भूत एकाएकीं समोर दिसल्याप्रमाणं, रावबहादुर अगदीं विलक्षण भयचकित झाले!

समोर 'प्युरीटन' मीनाक्षी अन् तिचा हात धरून एक अपरि-चित सुंदर ऐटबाज तरुण!

मीनाही विलक्षण चकित झाली. कांहीं क्षणांनीं आश्चर्यांतून शुद्धिवर आल्यावर, आवंढा गीळल्यासारखं करून ती म्हणाली, "हे माझे जिवलग मित्र जयंतराव चिटणीस. रेडिओ इंजनियर आहेत हे—आपल्याच बंगल्याच्या जवळ आहे यांची शो-रूम. पुण्यांत दोन घरंही आहेत भाड्यानं दिलेलीं—हे—हे..."

रावबहादुर उद्गारले, "ठीक ठीक—आपण बोलूं त्याबद्दल सविस्तर घरीं..."

• • •

अनुक्रमणिका







# सांपळा

नागपूर स्टेशनवर गाडी थांबली तेव्हां आपला धाकटा भाऊ या स्टेशनवर आपल्या डब्यांत चढेल हें त्याच्या ध्यानींमनींहि नव्हतं. इतकंच नव्हे तर आपला हा उनाड भाऊ कधींकाळीं नजरेला पडेल अशीहि त्याची अपेक्षा नव्हती.

तो होता कलकत्याला एका बँकेचा मॅनेजर.

आपला भाऊ कुठं दिसला तर मला तातड-तोब कळवा असं ठिकठिकाणच्या आपल्या मित्रांना त्यांना लिहूनहि टाकलं होतं. 'दिसायला हुबेहूब माझ्यासारखाच आहे, तेव्हां त्याची ओळख पटायला फारसें कठीण जाणार नाहीं.' अशी खूण त्यानं दिली होती.

पण असल्या उपायांनीं पायाला सदैव भिंगरी बांधून फिरणाऱ्या त्याच्या उनाड, लफडेबाज, लफंग्या भावाचा शोध थोडाच लागणार होता?

आज काय आग्ऱ्याला त्यानं एका पंजाबी व्यापाऱ्याला पांच हजाराचा गंडा घातला...उद्यां काय नैनिताल येथें लाला हरकचंदांच्या घरावर पडलेल्या दरोड्यांत त्याचा हात होता...परवां काय खोटा चेक वटवून त्यानं त्रिचनापल्लींतील एका बँकेला पंचवीस हजाराला हातोहात फसविलें ...एक ना दोन..अशा कितीतरी बातम्या वरचेवर कानावर येत होत्या.

अन् आज अचानक ..

नागपूर स्टेशनवर तो नेमका त्याच्याच डब्यांत चढला तेव्हां मनांतून त्याला आनंद झाला होता तरी तो बाहेर दिसूं न देण्याची तो पराकाष्ठा करीत होता. 'खरंच, किती साम्य आहे आम्हां दोघांच्या रूपांत! याला पाहिल्या-बरोबर माझा मलाच संभ्रम पडूं लागला आहे कीं समोरच्या बर्थवर बेडींग ठेवीत असणारा तो मी तर नव्हे!' या कल्पनेंत तो स्वतःशीं हंसलाहि.

त्यानं आपल्या भावाकडे पाहिल्यासारखं केलं नि हँडबॅगेतून कसलं तरी पुस्तक काढून तें चाळण्याचा आविर्भाव करूं लागला.

तेवढ्यांत गाडी सुरू झाली. आतां त्या दोघांशिवाय दुसरं कुणी नव्हतं.

थोरला भाऊ बसल्या जागेवरून उठला नि धाकट्या भावापाशीं आला.

त्याच्या खांद्यावर हात ठेवून त्यानं विचारलं, "मला ओळखलंस?"

धाकटा भाऊ कांहीं बोलला नाहीं.

"दयानंद...दया . दया...मी अनंता... तुझा थोरला भाऊ." तरीहि धाकट्या भावानं हुं कीं चूं केलं नाहीं.

अनंतानं त्याच्या पाठीवरून हात फिरविला नि त्याची हनुवटी धरून त्याचा चेहरा वर करीत तो आईच्या मायेनं त्याला उपदेश करूं लागला.

"दया, कशाला तूं हें सारं करतो आहेस? कशाला या लांड्यालबाड्या! कशाला नाहक कुळाच्या नांवाला काळं फांसण्याचा हा उपद्व्याप?...तुझी स्थिति पहा नि माझी स्थिति पहा. मी तुझ्यासारख्या चोऱ्यामाऱ्या केल्या नाहींत. कुणाचे केंसानं गळे कापले नाहींत. अन् आज...आज तुझ्यापेक्षां मी किती तरी सुखी आहे. तुझ्यासारखे हजारों रुपये मी हाताळले नसतील कदाचित्, पण तुझ्यासारखी पोलीसांची भुणभुण माझ्यामागें नाहीं...दया, आतां मी कुठं चाललों आहे माहीत आहे? विचार मला...विचार... मी आतां इंग्लंडला चाललों आहे. बँकेतर्फे तिथल्या कांहीं संस्थांशीं बोलणीं करण्यासाठीं माझी खास निवड करण्यांत आली आहे. आणखी दोन चार दिवसांनीं मी मुंबईला स्ट्रॅथमोर बोटींत बसेन..."

दयानंदाला त्याचे शब्द ऐकवत नव्हते. आपल्या भावाविषयीं त्याच्या मनांत यत्किंचि-तहि प्रेमाची भावना नव्हती.

पहातां पहातां त्यानं कोटाच्या खिशांतून पिस्तुल काढलं नि अनंताला गोळी घातली. अनंता गतप्राण होऊन पडला. शेवटची किंकाळी मारण्याइतकाहि अवधि त्याला मिळाला नाहीं.

मग दयानंदानं आपले कपडे काढून ते अनंताच्या अंगावर चढवले नि अनंताच्या अंगावरचे कपडे आपण घातले. त्याच्या खिशांतल्या सगळ्या वस्तु त्यानं लंपास केल्या.

पोलीसांच्या हातावर तुरी देऊन पळण्याचं अमोघ साधन अनायासें त्याच्या हातांत आलं होतं. त्याच बेहोषीनं त्यानं अनंताचं प्रेत उचलून डब्याबाहेर फेंकूनहि दिलं.

गाडी बोरीबंदर स्टेशनवर येऊन उभी राहिली तेव्हां पोलीसांनीं आपल्या डब्याला गराडा घातलेला पाहून त्याला अचंबा वाटला. अनंताच्या खुनाची बातमी इतक्यांत या लोकांना लागली तरी कशी?

आपण गोंधळलों आहोंत हें बाहेरून दिसूं न देतां तो हंसत हंसत, प्लॅटफॉर्मवरून आपल्याच दिशेनं येत असलेल्या पोलीस इन्स्पेक्टरला म्हणाला:

"तुम्ही कुणाच्या शोधांत आहां तें मला माहीत आहे."

"कुणाच्या?"

"अनेक ठिकाणीं पैशांची अफरातफर केल्याचा आरोप ज्याच्यावर आहे त्या दयानंद शिरगोपी-करच्या. बोला, बरोबर ओळखलं कीं नाहीं?"

"तुम्हीं दयानंदाला पकडायला आला असलात तर तो मी नव्हे हें आधींच सांगून ठेवतों तुम्हांला. मी आहे दयानंदाचा भाऊ. अनंत शिरगोपीकर. कसा अगदीं हुबेहूब त्याच्यासारखाच दिसतो, नाहीं? मी कलकत्याला असतों. एका.."

अन् त्याचं पुरतं बोलून व्हायच्या आंत इन्स्पेक्टरनं बरोबर आलेल्या हवालदाराच्या हातांतील बेड्या घेतल्या व त्या दयानंदाच्या हातांत अडकविल्या.

"माफ करा, पण तुमच्याच शोधांत होतों आम्हीं!"

"तुमच्या म्हणजे कुणाच्या? दयानंदच्या कीं अनंताच्या?"

"अनंताच्या"

"अनंताच्या?"

"हो"

"पण कां?"

"कां? कलकत्याला आपल्या बायकोचा खून करून इंग्लंडला पळून जाण्याचा आपला बेत फिसकटला म्हणून असं नाटक करायची जरूर नाहीं कांहीं!"

"अहो, अहो, पण..." ● ●

गंगाधर गांगुली



अनुक्रमणिका

# चीनची चित्रकला

भय्यासाहेब ओंकार



फार प्राचीन काळापासून भारताबरोबरचे चीनचे कलासंबंध विशेष जिव्हाळ्याचे आहेत. ह्यू एनत्संग या प्रसिद्ध चिनी प्रवाशानें बौद्ध ग्रंथांबरोबरच भारतीय मूर्तिकलेचे नमुने चीनमध्यें नेले असें इतिहासांत नमूद आहे. बौद्ध-धर्माबरोबरच भारतीय चित्रकलेनेही चीनमध्यें प्रवेश केला. चीनमधल्या प्राचीन बौद्ध मंदिरांत अजून अजिंठा चित्रपद्धतीचे अवशेष पहायला मिळतात.

चिनी कलेची कांहीं वैशिष्टें भारतानेही मोठ्या प्रेमानें स्वीकारली आहेत. चीनला स्वतःची अशी कांहीं स्वतंत्र कलावैशिष्टे आहेत. विशेषतः फुलें, पक्षी आणि निसर्ग यांच्या चित्रिकरणांत चीनची बरोबरी कोणी करूं शकणार नाहीं. चीनच्या या निसर्ग चित्रणाच्या पद्धतीचे अनुकरण आशियांतल्या बहुतेक देशांनीं केले आहे. जपान, इराण आणि पर्शियानें ही पद्धत आत्मसात केली आणि चीनची ही थोर कलापद्धती जहांगीरच्या काळांत भारतानें पर्शियन कलावंतांपासून घेतली. भारतांतल्या अर्वाचीन बंगालीकला-पंथावर चिनी चित्रकलेचा परिणाम स्पष्ट दिसतो. भारताचे आणि चीनचे कलासंबंध असे जिव्हाळ्याचे आहेत म्हणूनच चिनी चित्रकलेचा परिचय औचित्याचा ठरेल.

## अक्षर लेखनाची कला

जगांतल्या इतर सर्व कलापद्धतीपेक्षां चिनी कलेंत आढळून येणारे महत्वाचे वैशिष्ठ्य म्हणजे अक्षर लेखनाशी तिचा असलेला संबंध. चीनमध्यें अक्षर लेखनाला चित्रकलेइतकीच मोठी कला मानण्यांत येते. याचे मुख्य कारण म्हणजे चिनी लिपी ही चित्रकलेंतूनच निर्माण झाली आहे. चित्र-कलेच्या विविध सांकेतिक आकारांतून चिनी लिपी अवतरली. अर्थात चिनी चित्रकलेंतील सौंदर्याचा थाट त्या लिपीला लाभला हे जसें खरें तसेंच ती लिपी डौलदारपणें लिहि-णाऱ्याला, कलावंताचे हस्तलाघव असणें अगत्याचें आहे हेही तितकेच खरे. म्हणूनच सुंदर चिनी लिपी लिहिणाऱ्याचा गौरव थोर कलावंत म्हणून करण्यांत येतो. चिनी लिपीं-तले उत्कृष्ट अक्षरांचे नमुने म्हणजे उत्कृष्ट कलाकृती होत.

मि फेइ या सुप्रसिद्ध अक्षर कलावंताबद्दल त्याच्या चहात्यांनी काढलेले पुढील उद्गार पहा, " एखाद्या रणधुरंधरानें धारदार तलवार चपलतेनें फिरवावी तशी त्याची लेखणी सफाईनें चालते. एखाद्या धनुर्धरानें बाणा-मागून बाण सोडावे तशी तो अक्षरें चटाचट साकार करतो. एखाद्या कसबी घोडेस्वारा-प्रमाणें त्याची लेखणीवर हुकमत आहे. इशाऱ्यासरशी ती हवी तशी फिरते. " या स्तुतिसुमनावरून अक्षर लेखनाच्या कलेला चीनमध्यें किती मान आहे ते लक्षांत येईल.

अनुक्रमणिका

अर्थात या अक्षर लेखनांतील कौशल्याचे परिणाम स्वाभाविकपणेच चित्रकलेवर घडले. बहुतेक जे लेखनीक असत ते चित्रकारही असत. आणि त्यांच्या लेखनांत जसे चित्रकलेचे सौंदर्य प्रदर्शित होई तद्वतच त्यांच्या चित्रांत लेखणीची सहजता प्रत्ययाला येई. चिनी चित्रकलेचा मुख्य भर रेषाकृतीवर आहे. सुंदर रेषा हे चिनी चित्रांचे वैशिष्ट आहे. आणि यां रेषांत सहजता, चपलता, जोरकसपणा, फटकारेबाजी हे लेखणीचे सर्व गूण प्रतीत होतात. केवळ शाईनें काढलेली कैक तरी चिनी चित्रें जगमान्यता पावली आहेत. अवघ्या चार, सहा मोजक्या फटकाऱ्यांत चिनी चित्रकार चित्रविषयांतले सौंदर्य चित्रांत साकार करून दाखवतो.

## चिनी कलावंतांचे निसर्ग प्रेम

सुंदर फुलांचे आणि फुलपाखरांचे, झाडांचे आणि निर्झरांचे, पक्ष्यांचे आणि खारोट्यांचे, किड्यांचे आणि शंखशिंपल्यांचे, चिनी कलावंतांना विलक्षण वेड आहे. सुंदर फुले आणि सुंदर पक्षी गेलीं हजारोवर्षे ते चितारीत आले आहेत. आणि अजुनही त्याच्यांतील गोडी त्यांना कमी वाटत नाहीं.

चिनी कलावंत भोंवतालचें सारे जग विसरून जातात आणि आपली दृष्टि केवळ एका फांदीवर सरसर चढणाऱ्या खारीवर केंद्रिभूत करतात. केवळ दोनचार पानाची ती फांदी आणि त्यावर आपल्या शेपटीचा गोंडा फुलवून पुढे पळत निघालेली खार एवढाच चित्रविषय त्यांना पुरेसा वाटतो. चार पानाची अशीच दुसरी एखादी डहाळी आणि पानाच्या कडेवर सुस्त होऊन चिकटलेला किडा एवढ्या छोट्या विषयांतच ते कलासौंदर्य प्रगट करतात. निसर्गाच्या सौंदर्यावर प्रेम करणारा चिनी कलावंत 'जे पिंडी ते ब्रह्मांडी' अगर जे 'समुद्रांत ते थेंबांत' या तत्वानुसार निसर्गाच्या कणाकणांतही सौंदर्य पहातो.

निसर्गातल्या छोट्या छोट्या गोष्टींतील सौंदर्य प्रेक्षकांना पटविण्यासाठीं चिनी कलावंत आणखी एक युक्ति योजतो. अगदीं जवळ कठड्यावर बसलेला बुलबुल पक्षी अगदी बारकाव्यानें तो रंगवतो आणि त्याच्या पाठीमागे दिसणारे दूरवरचे देऊळ अगर पर्वतराजींचा देखावा अगदी अंधुक रंगांत चितारतो. जणूं दूरवरची मैलभर पसरलेली ती सारी सृष्टिशोभा तागडीच्या एका पारड्यांत आणि हा छोटा बुलबुल पक्षी दुसऱ्या पारड्यांत घालून, बुलबुलाचेंच सौन्दर्य अधिक आहे असें चिनी कलावंत दाखवित असतो. जणूं तो म्हणतो, "निसर्गाच्या भव्य सौन्दर्याचा अनुभव कुणालाही येईलच पण मी दाखवतो त्या छोट्या गोष्टीकडे तुमचें लक्ष कधीं गेले आहे का! या छोट्याशा पांखरांत केवढी शोभा आहे ते बघा ना!"

## कलेंतील एकतानतेचें महत्व

निसर्गशोभेवर चिनी चित्रकारांचें एवढें प्रेम असलें तरी त्याकडे त्यांची पहाण्याची



दृष्टि युरोपीय कलावंताप्रमाणें वास्तववादी नाहीं. सृष्टीचे केवळ बाह्य दृश्य स्वरूप चित्रीत करण्यासाठीं ते आपला कुंचला उचलीत नाहींत. तर त्या सृष्टीच्या अंतरंगांत त्यांना शिरायचें असते. सृष्टीच्या दर्शनानें स्वतःच्या मनावर होणारे परिणाम त्यांना चित्रित करायचे असतात. मनांत उमटलेल्या प्रतिभेला व्यक्त स्वरूप द्यायचे असते. अंतरमनांतली ही प्रतिभा स्पष्टपणें प्रतीत व्हायला चित्रकाराची एकतानता व्हायला हवी. मनाच्या या तल्लीन अवस्थेचे महत्व चिनी चित्रकार पूर्वीपासून मानत आले आहेत.

११ व्या शतकांतला थोर निसर्गचित्रकार कुओहसि हा मनाच्या एकाग्रतेसाठीं कसा जपत असे याचे वर्णन त्याच्या मुलानें पुढील शब्दांत केले आहे. तो म्हणतो, "माझे बाबा स्वच्छ टेबलाशी बसत, स्वच्छ प्रकाशमान खिडकीजवळची जागा ते निवडीत. उजव्या, डाव्या हाताला सुगंधित धूप जळत असे. उत्कृष्ट कुंचला आणि उत्कृष्ट शाई ते तयार ठेवीत. हात स्वच्छ करीत. दौताळे साफ करून घेत. जणूं एखाद्या उमरावाच्या स्वागताची ही जय्यत तयारी असे. मग मन शांत आणि स्थिर होईपर्यंत ते थांबत आणि मनाची स्थीरता लाभली म्हणजे कामाला आरंभ करीत."

कांहीं चिनी कलावंत मनाच्या या समाधीसाठी मदिरापान करीत तर काहीं संगीत श्रवण करीत.

## वेळूबनाचीं चित्रें

निसर्गचित्रणांत 'वेळूबनाची चित्रें' हा चिनी चित्रकलेंतला स्वतंत्र प्रकार आहे. वेन टुंग, लिकान, कुशान्, वुचेन व नित्सान हे चित्रकार वेळूची चित्रें काढणारे म्हणूनच चिनी चित्रकलेंत प्रसिद्धीला आले. वेळूच्या चित्राचे चिनी मनाला एवढें आकर्षण वाटण्याचें कारण म्हणजे या चित्रांतील कलमाचे कौशल्य हें अक्षरलेखनांतील कौशल्याशीं साम्य दाखवते. चिनी अक्षरें काढतांना ज्या रितीचे फटकारे वापरतात त्या रितीनेंच फटकारे मारून हीं वेळूचीं चित्रें काढलीं जातात.

हीं चित्रें म्हणजे प्रत्यक्ष वेळूच्या झाडाच्या दृश्य आकाराच्या केवळ प्रतिकृती नव्हेत. चित्रकाराच्या सौन्दर्यकल्पनांचा तो आविष्कार आहे. त्याच्या मनांतल्या भावनांचे प्रगटीकरण आहे. व्यक्तिमत्वाचा तो ठसा आहे. चित्रकार लिकान म्हणतो, "प्रत्यक्ष वेळूंकडे पाहून चित्रकाराच्या मनांत वेळूबन साकार व्हायला पाहिजे. तसे झालें तरच तो चित्र काढूं शकेल. नाहींतर केवळ समोरच्या वस्तूकडे पहात बसण्यापलिकडे त्याला कांहीं करतां यायचें नाहीं."

या बाबतींत वू चेन एखाद्या कवीच्या भाषेंत बोलतो, "वेळूबनाचीं चित्रें मी केवळ माझ्या हृदयांत सांठवलेल्या भावनांना वाट करून देण्यासाठींच काढतो. मग ती लोकांना आवडोत वा न आवडोत. ती वेळूसारखी दिसोत अगर न दिसोत."

चिनी कलावंत जसे या वेळू बनांत कांहीं अमूर्त सौन्दर्याचा साक्षात्कार अनुभवतात तसेच प्रेक्षकहि चीनवर आलेल्या मोंगल परचक्राच्या काळांत वाऱ्याच्या वावटळीत सळसळणाऱ्या वेळूबनाची चित्रें चिनी जनतेंत लोकप्रिय झाली होती. वादळी वाऱ्यांत उभे

राहिलेले ते वेळू म्हणजे मोंगलांच्या स्वाऱ्यांना धैर्यानें तोंड देणारी चीनची देशभक्तीच होती!

### चिनी चित्रकारांची साधन-सामुग्री

काळीभोर शाई, विविध आकारांचे कुंचले कागद आणि तलम रेशीम ही चिनी चित्रकाराच्या साधनांतील महत्वाचीं साधनें होत. या साधनांच्या पाठीमागें हजारों वर्षांचा इतिहास उभा आहे. लांडगा, कोल्हा, हरीण, ससा, डुक्कर, बकरा आणि खार अशा विविध प्राण्यांच्या केंसापासून ब्रश तयार करण्याची पद्धत चीनमधें रूढ होती.

काळयाभोर शाईचें महात्म्य चीनमध्यें फारच मानण्यांत येई. काजळ आणि डिक यांचें मिश्रण तापवून त्याच्या वड्या पाडण्यांत येत. ही वडी पाण्यांत घोटून हवी तेवढी शाई बनवली जाई. अशा तऱ्हेच्या शाईच्या कांड्या जितक्या जुन्या तितकी त्याची किंमत अधिक. शतकानुशतकें ठेवलेल्या अशा शाईच्या कांड्यांकरितां कलावंत सोन्याची नाणींही मोजायला तयार असत!

जगाच्या इतिहासांत कागदाचा शोध लावण्यांत चीन अग्रेसर आहे. अरबांपूर्वी सहाशे वर्षें आणि युरोपाआधी हजार वर्षें चीनमध्यें कागद प्रचलीत होता. इ. स. १०५ मध्यें चिनी राजदरबारच्या एका रक्षकानें रेशमापेक्षां स्वस्त म्हणून कागद ही वस्तू बनवून बादशहाला सादर केली. आणि त्यानंतर अवघ्या तीस वर्षांच्या अवधींत कागद इतका प्रचारांत आला कीं त्यांमुळें रेशमाची टंचाई भासू लागली. शाईप्रमाणें दोन दोनशें वर्षांच्या जुन्या कागदाला चीनच्या बाजारांत अधिक किंमत द्यावी लागे. हे कागद दगडानें घोटून गुळगुळीत करून चित्रकार त्यावर चित्रकाम करीत.

रेशमावर काढलेली चित्रे हे तर चिनी चित्रकलेचें खास वैशिष्टय आहे. इ. स. पूर्वी तीनशें वर्षें चित्र काढण्यासाठीं व लिहिण्यासाठीं चिनी लोक रेशमाच्याही जुनेपणाला विशेष महत्व असें. चित्र काढण्यास रेशमाचा उपयोग करण्याआधी त्यावर संस्कार करावे लागत. फार पूर्वी कढत डिंकाच्या पाण्यांत रेशीम भिजवून खड्डू अगर खळ त्यांत जिरवण्यांत येई. त्यामुळें ते रेशीम गुळगुळीत बने व प्रकाश परावर्तित करण्याइतकीं त्याला झिलाई चढे. त्यानंतरच्या काळांत रेशमाला दगडानें घोटून पॉलीश करण्याची रीत रूढ झाली. पण पुढें ही पद्धत मागें पडून डिंक व तुरटीच्या पाण्याचे मिश्रणाचा लेप कलावंत देऊं लागले. हा लेप देण्याच्या बाबतींतही प्रत्येक कलावंताचें कसब निराळें असे आणि त्यांतही कांहीं विशेष कौशल्याचा भाग असे. उत्कृष्ट लेप दिलेले रेशीम 'हिमाप्रमाणें शुभ्र आणि पाण्याप्रमाणें नितळ' दिसे.

चित्र पूर्ण झाल्यावर ते टिकवण्यासाठीं कांहीं विशेष गोष्टी चित्रकार करीत असत. कागदावर अगर रेशमावर काढलेले चित्र टिकवण्यासाठीं त्याला पुढून व मागून तुरटीच्या पाण्याचा हात देण्यांत येई. यामुळें रंग विरत नसत अगर त्याच्या खपल्या पडत नसत. रेशमी चित्राच्या मागच्या बाजूनें पांढऱ्या रंगाचा हात देण्यांत येई. त्यामुळें चित्राच्या मागील बाजूनें रंगावर हवेचे परिणाम होत नसत आणि त्याशिवाय मागील पांढरा रंग रेशमी धाग्यांतून दर्शनी बाजूत शुभ्र तजेल्दार छटा परावर्तित करी.

रेशमावर काढलेलें चित्र पूर्ण झाल्यावर चित्रकार ते कोरड्या हवेंत वाळवी अगर चटकन् कोरडे करण्यासाठीं खडुची भुकटी

त्यावर टाकून ती ब्रशानें झटकून टाकी. चित्र वाळले म्हणजे त्याच्या मागच्या बाजूस कागदाचे थर चिकटवून त्यास जाडी आणली जाई. नंतर ते मोठ्या माउंटवर चिकटविण्यांत येई. या माउंटच्या चारी बाजू सुंदर कलाकुसरीच्या काठानें विणलेल्या असत. त्यामुळें फ्रेम केल्याप्रमाणें ते चित्र दिसूं लागे.

### रेशमी चित्रपट

रेशमावरील चित्रांचे प्रकार चीनमध्यें रूढ आहेत. 'चोऊ' म्हणजे भिंतीवर टांगायचे रेशमी चित्र 'चुआन, म्हणजे लांबलचक रेशमी पट्ट्यावर काढलेलें चित्र. हे चित्र हातांत धरून पहावें लागतें. तिसरा प्रकार 'टोयुफांग' म्हणजे अलबममध्यें चिकटवावयाची रेशमावरील छोटी चित्रें. आणि चौथा प्रकार 'टसें शान.' ही रेशमी चित्रें पंख्यासाठीं उपयोगांत आणतात.

'चुआन' म्हणजे हातानें उलगडून पहावयाचा चित्रपट हा मोठा औचित्यपूर्ण प्रकार आहे. पेकिंग राजवाड्यांत असलेले व हसि कुयी या नांवाच्या चित्रकारानें काढलेलें 'यांगत्सी नदीचें चित्र' या दृष्टीनें पहाण्यालायक आहे. १ फूट रुंद आणि ३६ फूट लांब असा हा रेशमी चित्रपट आहे. प्रेक्षकानें एका वेळी एका फुटापर्यंतचाच भाग बघावा अशी अपेक्षा आहे. आधीचा भाग गुंडाळत यायचा आणि पुढचा भाग उलगडायचा. आणि अशारितीनें हा चित्रपट प्रेक्षक पाहूं लागला म्हणजे खरोखरीचा एखादा चलित चित्रपट डोळ्यापुढून सरकल्यासारखा त्याला आनंद होतो. यांगत्सी नदीच्या छोट्या उगमापासून तो ती विशालरूप धारण करून समुद्राला मिळेपर्यंत विविध देखावे या चित्रपटांत चितारले आहेत. नदीच्या उगमानें आरंभ होतो आणि प्रेक्षक जसा चित्रपट उलगडत जातो तशी ती नदी खळखळत, विविध झऱ्यांना पोटांत सामावत, कड्यावरून उड्या मारीत, वनराईतून वळणें घेत आणि क्रमाक्रमानें मोठी होत प्रेक्षकाच्या दृष्टिबरोबर धावूं लागते. पुढें पुढें जलप्रवाह मोठा होतो आणि प्रौढावस्थेचे गांभीर्य नदी धारण करते. आणि अखेरीस तिचे स्वरूप इतकें विशाल बनते कीं एकावेळीं सहा मच्छिमारी बोटी तिच्यावर जलविहार करूं लागतात. मग पलिकडचा किनारा अस्पष्ट होऊं लागतो आणि अखेरीस ही महानदी समुद्राला मिळते तेव्हां तर तो किनारा केवळ एक रुपेरी काडी



बनतो. छत्तीस फुटाच्या या चित्रांत यांगत्सी नदीचें हे पाणी चित्रकारांने असें खेळवलें आहे.

### कांहीं मनोवेधक नोंदी

या रेशमी चित्रपटावर पहाण्याजोगा आणखीही एक कुतुहलाचा भाग असतो. चीनमध्यें मानण्यांत येणाऱ्या अक्षरलेखनच्या कलेला चित्रामध्यें स्थान दिलेले असते. चित्राचा कांहीं भाग लेखनानी व्यापलेला असतो. त्यामुळें चित्र वेडौल होत नाहीं उलट ही अक्षरे काढतांना चित्र रचनेच्या सौंदर्यांत भरच घालतील अशीच जागा त्यासाठीं निवडली जाते. आणि चित्र जितके मनोरंजक तितकेंच हे लेखनही मनोरंजक असते. चित्र केव्हां काढलें, कोणी काढलें, कुणासाठीं काढले आणि ते कशाचें आहे याची नोंद त्यावर असतेच पण त्याबरोबरच कांहीं आणखीनही गमतीदार नोंदी असतात.

काओकोनी काढलेल्या 'पर्जन्यांतील पर्वत' या चित्रावर त्यानें स्वतः लिहिले आहे. "आतां चित्र पुरें झालें आणि चित्रांत जणूं खरोखरीच पाऊस कोसळूं लागला. काय मजा आहे!"

युनलीननें 'झुंगहसी स्टुडिओ' या नांवाचे चित्र डॉ. जेन चुंगसाठीं काढले. त्यावर त्यानी लिहून ठेवले आहे, "माझ्या जन्म गांवी असलेला 'झुंग हसी स्टुडिओ' हा माझा जुना स्टुडिओ. तेथें आता डॉ. जेनचुंग रहातात. मी एक दिवस माझ्या जन्मगांवी परत जाईन. माझ्या या जुन्या स्टुडिओंत बसेन. समोर हे चित्र उघडलेले असेल. आणि जेन चुंग बरोबर पेय घेत आणि पान खात गप्पा मारीन. तेव्हांचे माझ्या मनाचे समाधान होईल." दुर्दैवाची गोष्ट अशी कीं चित्रावर चित्रकारानें लिहिलेली ही इच्छा पुरी झाली नाहीं कारण चित्रकार थोड्या दिवसांतच मृत्यू पावला. चित्रावरचा मजकूर यामुळेच प्रेक्षकाच्या मनांत कालवाकालव निर्माण करतो.

चित्रकारांच्या या नोंदी प्रमाणें रसिकांच्याही नोंदी उल्लेखनीय आहेत. 'टाई पर्वतावरील घर' हा वांग मेंगने काढलेला देखावा चिनी बादशहा चिरान लुंगला इतका आवडे कीं ज्या ज्या वेळीं तो ते चित्र उलगडून पाही त्या त्या वेळी तो त्यावर प्रशंसेचे शेरे लिहून ठेवी. या शेऱ्यांची संख्या जेव्हां चौपन्नाहून अधिक झाली तेव्हां बादशहाला स्वतःचीच लाज वाटली आणि मोठ्या संयमानें त्यानें अखेरची नोंद केली कीं, "जेव्हां हे चित्र यापुढें माझ्यासाठीं उलगडले जाईल तेव्हां मी त्यावर कांहींही लिहिणार नाहीं!"

आला, आला
संयुक्त महाराष्ट्र आला!!



कुठें आहेत माझी शस्त्रें?




—दिवाकरांच्या नाट्यछटा म्हणजे मराठी वाङ्मयाचें बहुमोल लेणें ! हा वाङ्मयप्रकार दिवाकरांच्या मृत्यूनंतर त्यांच्याइतक्या यशस्वितेनें कोणीच हाताळूं शकला नाहीं. १९३७ सालीं ज्योत्स्ना मासिकानें दिवाकरांच्या स्मृत्यर्थ जो खास अंक प्रसिद्ध केला त्यांतील हा लेख म्हणजे त्या थोर कलावंतांचें अत्यंत हृदयस्पर्शी असें व्यक्तिचित्र ! त्या लेखां-तल्या कांहीं छटा ! !......

# नाट्यछटाकार दिवाकर

**— प्रो. श्री. श. रानडे**

१९११ च्या पावसाळ्यांत फर्ग्युसन कॉलेजमागील टेकडीवरील अज्ञात मानवाच्या थडग्याजवळ प्रो. वा. ब. पटवर्धनांनीं दिवाकरांची व माझी प्रथम ओळख करून दिली. १९१३ मेपर्यंत पटवर्धनांच्या घरीं गांठ पडे व तेथेंच नवीन नाट्यछटा ऐकावयास मिळून चर्चा होई. या वेळांत फक्त एकदांच त्यांनीं मला घरीं बोलावलें. या जुन्या जमान्यांत संबंध पुण्यांत ब्राउनिंग कवीचा रसास्वाद घेणारीं माणसें प्रो. पटवर्धन, हरी नारायण आपटे, रावसाहेब गो. वा. कानिटकर, श्री. काशीबाई देवधर, यांखेरीज बोटावरच मोजण्याइतकीं कदाचित् असतील एकदोन वेळां मी अनुमान धपक्यानें सांगितलेला अर्थ ब्राउनिंग कोशांत तसाच निघाला यावरून व १९१३ सालीं माझ्या आयुष्यांत घडलेली त्या काळांतली तरी विलक्षण–घटना त्यांना आवडली व त्यामुळें पटवर्धन व गर्गे या दोघांना माझ्याविषयीं कुतुहल व जिव्हाळा उत्पन्न झाला. नवीन नाट्यछटांतील अंतरंग, वैशिष्ट्य, प्रसंग व गर्भित अर्थ मला समजल्यास त्यांना आनंद होई व न कळल्यास ते सांगत. हा प्रकार अगदीं अखेरपर्यंत होत असल्यामुळें, रा. दिवाकरांच्या लिखाणांतील अंतरंग समजण्यास अत्यंत मदत झाली.

सर्व प्रसिद्ध झालेल्या नाट्यछटांचे लेखन-काल लक्ष्यपूर्वक अभ्यासणारास असें समजून येईल कीं १९११ ते १९१६ पर्यंत बहुतेक नाट्यछटा लिहिल्यानंतर १९१६ ते १९२६ हा कालखंड स्वतंत्र लेखनाच्या दृष्टीनें निष्क्रिय गेला आहे. अत्यंत सुखांच्या किंवा दुःखाच्या अनुभूतीच्या काळांत लेखकांची लेखणी मंदावते. १९२३ ते १९३१ या नऊ वर्षांच्या अवधींत ११ नाट्यछटा व ५ गोष्टी एवढेंच लिखाण दिवाकरांनी लिहिलें.

या शेवटच्या लिखाणांत कल्पनेला निराळें वळण लागलें आहे तरलतेला पायबंद पडला आहे. तारुण्यांतील धडाडी कमी झाली आहे. उलटपक्षीं मानवी स्वभावाचें सूक्ष्म ज्ञान जास्त कुशलतेनें प्रकट झालें आहे. वैतागलेली मनःस्थिति थोडीशी शांत होऊन वात्सल्य वाढलें आहे. आरंभींच्या नाट्यछटांतून मधूनमधून उफाळणारा गूढवाद जिवाला जास्तजास्त बुचकळ्यांत पाडीत आहे हें स्पष्ट दिसूं लागलें.

१९१० ते १९१३ या कालखंडांत लिहिलेल्या नाट्यछटांपैकीं कांहीं रा. न. चिं. केळकरांनी केसरींत हप्त्यांनी प्रसिद्ध केल्या. पहिला हप्ता प्रसिद्ध झाला त्यावेळीं व नंतर ' कारकून ' नाटकाच्या रंगभूमीवरील प्रयोगाचे वेळीं, या दोनच प्रसंगीं दिवाकरांना खरा आनंद मिळाला. तरी पण ' फाटलेला पतंग ' ही स्वतःलाच आवडणारी छटा इतरांना तितकीशी आवडली नाहीं म्हणून विषाद वाटला. या कालांतील नाट्यछटा पुन्हां पुन्हां सुधारून दिवाकरांनी हलके-हलके मासिकांतून प्रसिद्ध होऊं दिल्या. मनोरंजनाचे मित्र, उद्यानचे ग. वि. कुळकर्णी, रत्नाकरचे अप्पासाहेब गोखले हे अजीजीनें, आंजारून गोंजारून एखादी दुसरी नाट्यछटा कष्टानें मिळवीत. १९२३ नंतरचें लिखाण लवकर लवकर प्रसिद्ध करण्यास दिवाकरानीं फारसे आढेवेढे घेतले नाहींत. तरीपण वाटेल ह्या मासिकांतून भरभर लेख प्रसिद्ध केल्यानें लेखकांची खरी किंमत ओळखली जात नाहीं अशी त्यांची कल्पना होती. छटा लिहिण्यांत आपला हात धरणारा कोणी नाहीं ही जाणीव असूनहि डोळ्यांदेखत सर्वसंग्रह छापण्यास किंवा छापविण्यास ते विलकूल संमति देईनात. त्यांची महत्त्वाकांक्षा इतकी जबर कीं, मराठी ललित लेखकांना दोन पिढ्यातरी ती सत्य-सृष्टींत दिसणार नाहीं. ' आपलें पुस्तक प्रसिद्ध होण्याची लोक आतुरतेनें वाट पहात आहेत. प्रसिद्ध करण्याच्या दिवशीं पुस्तक-विक्रेत्याच्या दुकानासमोर पहांटेपासून मुंग्या-सारखी रीघ लागली आहे, तासांदोन तासांत सर्व मोठी आवृत्ती खलास झाली, अशी कांहीं स्थिती असली तरच माझें पुस्तक प्रसिद्ध करण्यांत मजा ' असें ते अर्धवट थट्टेनें पण






अनुक्रमणिका

अगदीं मनापासून म्हणत. पुणें सोडण्याचें त्यांच्या जिवावर येई. १९१२ च्या पूर्वी एकदां मुंबई पाहिली तेवढीच. परगांवीं आग्रहानें बोलावलें तरी आले नाहींत. मुंबईच्या विऱ्हाडीं बोलावलें तरी नकारच. एक दिवस त्यांनीं मनांतली गोष्ट उघड केली. आपलें घर आणि आपली खोली याशिवाय दुसरीकडे रहाणें आवडत नाहीं. कुठें पाहुणे जाणें नको. नवीन ओळखी करण्यास जीव भितो. शिवाय जिथें मानसन्मान नाहीं, कोणी ओळखणार नाहीं अशा गांवीं जा कशाला ? आणि आपणच एकट्यानें चैन करायची ! ही स्वतःची मनःस्थिती असून एवढ्याच कल्पनेचा धागा कल्पून ' मुंबईंत मजा गमतीची ' या नाट्यछटेने, किती निराळा माणूस व त्याचा परिवार निर्माण केला आहे ! यांतच त्यांची नाट्यशक्ति दिसून येते.

१९१४ ते १९१६ या काळांत युरोपीय लेखनावरून त्यांनीं एक नवीन उपक्रम सुरू केला. ' भर चौकांत ' या नाट्यछटेंत प्रथम या प्रकाराची त्यांना जाणीव झाली. अनेक पात्रांचा स्फुट वाक्यांचा गुच्छ, त्यांत ऐकणाराला कुठें अर्थशून्यता, कुठें संवाद, कुठें विवाद, कधीं विसंगति किंवा विरोध दिसून येतो. जगाचा Panorama चलद्दर्शन आपण पहात आहोंत असें वाटावें. पाऊस व निजलेलें मूल या लेखांतील कल्पनेची भरारी अलौकिक आहे. ' प्रवासी ' या संवादांतील मानवी जीवित पाहण्याची दिव्य दृष्टि, ' सारेच आपण ', ' ऐट करूं नकोस ' या नाटिकांतील मनोविश्लेषण याचें आकलन सामान्य वाचकांच्या कुवतीबाहेरचें होतें म्हणून कीं काय ' नाट्यछटा ' लोकप्रिय होऊन हे प्रकार उपांगें ठरलीं. अखेरीस १९१६ त त्यांनीं युरोपिय गूढ संवाद वाङ्मयाचा नमुना म्हणून एक रूपांतरीत संवाद " आंधळे " लिहिला. त्यावरून त्यांचा सफाईचा हात फिरला नव्हता. १९२३ ते १९३१ च्या काळांत नाट्यछटेपेक्षां नाट्यकथांवर त्यांचा भर जास्त होता. मेटरलिंकच्या ' आंधळे ' या नाटकासंबंधीं पाश्चात्य वाङ्मयाचा परिचय असणाराला विशेष सांगणें नको. ' आपण सर्वच आंधळे आहोंत. कुणी आहेत त्या स्थितींत सुखी आहेत. कुणाला जाणीव नाहीं, कुणाला तळमळ लागली आहे, कुणी घाबरत आहेत, कुणी भेकड आहेत, कुणी लबाड आहेत. काय एकेकाचें तत्त्वज्ञान, धर्मभोळेपणा, स्त्रीपुरुष कल्पना व आकर्षण ! अशा सुंदर जगांत आपण आंधळे वावरत आहोंत. भिन्न मतांचे, भिन्न पंथाचे व कमी जास्त उन्नतीचे जीव धडपडत आहेत. कुणाला जास्त संवेदना एकमेकांच्या साहाय्यानें सुंदर जगाची माहिती करून घेण्याची यांची धडपड. इतर अदृश्य जीव मदत करीत असतील पण आंधळ्यांना तें काय पुरणार. आंधळ्यांना अमर्यादीत कालाचा बोधच होत नाहीं. मागचीं सुखें पुरीं आठवत नाहींत, त्यांची स्मृति देखील मनाला पुरा आधार देत नाहीं. भर गर्दी असूनहि आपण एकटे. आपलें चिमुकलें जग भर वादळांत बुडूं लागलें तरी त्याची आपणास कल्पना येणार नाहीं. आपली सुटका ज्यांनीं करावी तेच नाहींसे झाल्याचें कळणें म्हणजे किती भयंकर ! बुद्धीला कळत नाहीं ते वेड्याला कळतें, रडतांना दिसतें, ज्याच्या केवळ Intuition ला समजतें अशा तान्ह्या बाळालाच कळतें. आतां आंधळ्यांचा सारा भर तान्ह्या बाळाच्या समजुतीवर आपणांस वाचविणारा आपणांतच येऊन थांबला ! पण पण तो कोण ? कुठें आहे ? '

या मेटरलिंकच्या नाटकानें दिवाकरांवर पकड बसविली व त्यांच्या हातून या काळांत संवादात्मक नाटकें व नंतर नाटककथा निर्माण झाल्या.

नाट्यछटेसंबंधीं जे थोडे लेख व प्रबंध प्रसिद्ध झाले आहेत त्यांत नाट्यछटेचें लेखन कसें सुरूं झालें याची उपपत्ती दिली आहे. ब्राउनिंगचें एकमुखी भाषण Monologue वरून कल्पना सुचली हें निर्विवाद आहे. कवित्वशक्ति नसल्यामुळें गद्यांतच लिहिणें ओघानें प्राप्त झालें. संस्कृत भाग वाचून त्यांतलें मर्म समजून त्या पद्धतीचा अंगिकार करण्याइतकें संस्कृतीचें ज्ञान किंवा आवड दिवाकरांना नव्हती. मनोरंजन, करमणुकींतील नेपथ्यपाठ ( Third Rate ) निकृष्ट, सोमेश्वरशास्त्राचें पुराण ( second Rate ) साधारण बरें असें ते म्हणत. ब्राउनिंग इतकें जगाचें सम्यक्ज्ञान किंवा जनमनाचा ठाव उभ्या आयुष्यांत कळणार नाहीं, प्रदीर्घ वाङ्मयलेखनाकडे प्रवृत्ति नाहीं, प्राचीन अर्वाचीन मराठी वाङ्मयाचा विशेष व्यासंग नसल्यामुळें भाषेवर यथातथाच प्रभुत्व अशा भूमिकेवरून दिवाकरांनीं नवीन वाङ्मय प्रकाराचा नवीन देह निर्माण केला; अर्थपूर्ण वेचक शब्द, सुटसुटीत वाक्यें, स्फोटक उद्गार, अपूर्ण विचार, रेघा, उद्गार, प्रश्नचिन्हें यांचा अर्थ व्यक्तिकडे उपयोग केला. तंत्रांतून नाट्यछटा निर्माण न होतां दिवाकरांनी नाट्यछटा लिहिल्यामुळें टीकाकारांना विशिष्ट तंत्र मानावें लागलें अशी वस्तुस्थिति आहे.

वीस वर्षांच्या वाङ्मयसंसारांत दिवाकरांनीं पुष्कळ निवडक ग्रंथांचें वाचन व परिशीलन केलें व थोडेंच पण अत्युत्कृष्ट लिहिलें. त्यांच्या विचारी बुद्धींत एक पठाडी गोम—नव्हे गोगलगाय होती. शब्दकोशाची कुबडी घेतल्याशिवाय ते पुस्तक उघडीत बसत आणि उतरत्या पेटीशीं बसून पेन्सील सज्ज करून दिवसांतून दहा पानें जेमतेम वाचलीं कीं पराकाष्ठा. इतक्या मंदगतीनें पण त्यानीं खरें अध्ययन केलें. रवीन्द्र बाबूंचें कांहींतरी वाचा असा १९१५ चा आग्रह वाया गेला. तेच नंतर १० वर्षांनीं गीतांजली वाचून त्यांतील मौजा आम्हांस सांगूं लागले. लेखन, आयुष्य तसेंच वाचन याप्रमाणें संथ, धोपटमार्गी—प्रो. पटवर्धन व प्रो. लागू या गुरुद्वयांनीं पुरस्कारलेलें वाङ्मय दिवाकरांनीं डोळे मिटून संपूर्ण वाचून काढलें. इब्सेन, जॉनसन हार्डी यांच्या वाचनानें व रॅशनॅलिझमच्या लाटेंत त्यांच्याबरोबरची कांहीं स्नेही मंडळी वाहत चालली पण हे सर्व ग्रंथकार पचवून दिवाकरांच्या बाह्य राहणींत व विचारांत रतिमात्र फरक कुणास दिसला नाहीं. ठेंगणी मूर्ति व जाडी विद्वत्ता यांची सांगड घालून कुणी त्यानां जॉनसन् म्हणत पण या अभिधानांतील कुरुपतेचा गर्भित अर्थ लक्षांत येऊन आलेला राग त्यांनीं त्या मित्रांनां जन्मभर कळूं दिला नाहीं.

रसिक व मर्मज्ञ स्नेही अण्णासाहेब कारखानीस व कुशल अभिनयपटु रा. केशवराव दाते यांनीं कारकून नाटकाची योग्यता ओळखून ' फाल्गुनरावाला ' जोड नाटक म्हणून त्याचे प्रयोग केले. दिवाकरांनीं यापूर्वी नाटकाचीं अनेक संस्करणें केलीं होतीं. तिसरा अंक अगोदर लिहून मग कांहीं काळानें पहिले दोन अंक लिहिले होते. त्यांच्या तोंडून बैठकींत नाटक ऐकतांना प्रथम प्रथम आम्हांला आनंद वाटे. पण

अनुक्रमणिका

तिसरा अंक वाचतांना होणारी त्यांची स्थिती पाहवेना म्हणून पुढें तसा आग्रह आम्ही कधीं केला नाहीं. नटवर्य दाते यांनीं दिवाकर-पंतांचें काम अत्यंत कौशल्यानें केलें. या नाटकाच्या प्रयोगामुळेंच ते आपलें 'आंधळ्याच्या शाळें' तील काम यशस्वी रीतीनें करूं शकले असावेत अशी कल्पना मनांत येते. अर्थात् रा. दातेच या कल्पनेसंबंधीं जास्त सांगूं शकतील. 'संशय कल्लोळ' च्या हास्य कल्लोळानंतर 'कारकून' नाटकानें थिएटरावर उदासीनतेचें आवरण कसें घातलें हें ते प्रयोग पहाणारानां आठवत असेल. या प्रयोगाचे वेळीं दिवाकर अत्यंत अस्वस्थ झाले होते. जणूं काय आपण आपलेंच जीवन नाटक पहात आहोंत असें त्यानां वाटत असावें.

पैसाफंड मेळ्यानें यांची एक नाट्यछटा अर्थात् परवाननी न घेतां बसविली होती व कु. सुमन परचुरे या मुलीनें गायिलेली ध्वनि-मुद्रिका ( Record H. M. V. ) नें प्रसिद्धहि केली. या नाट्यछटेच्या मागें ( 'काळी आहे का म्हणावें मी' ) माझी स्वतःची पहिली कविता मनोरंजनांत प्रसिद्ध झालेली—'नको भाऊले' अर्थात् परवानगी-वाचूनच, घेतलेली होती.

रेकॉर्ड ऐकून व असे पाठीला पाठ लावून बसलेले पाहून दिवाकरानां आनंद झाला. त्यांनीं तें गाणें अनेक वेळां आमच्या घरीं ऐकलें.

दिवाकर विद्यार्थी दशेपासून दैनंदिनी लिहीत. दिवसांतील ठळक ठळक गोष्टी, वाचन, लेखन, भेटीगांठी लिहून झालेल्या घटनेविषयीं किंवा संबंध आलेल्या व्यक्ति-विषयीं आपले विचार लिहून काढीत. या एका बाबतींत तरी जॉन्सनपेक्षां सॅम्युअल पेपीजशी त्यांचें साम्य होतें. ते म्हणत पेपीज डायरीमुळें त्या काळच्या लोकस्थितीवर प्रकाश पडला. माझ्या डायरीवरून माझें व भोंवतीच्या लोकांचें मात्र अंतरंग कळेल, जास्त कांहीं नाहीं. दरवर्षी ३१ डिसेंबर रोजीं वर्षाची डायरी वाचून काढायची, रात्रीं दहानंतर मित्रांघरीं गप्पा गोष्टी करून बरोबर १२ वाजतां कॉफी किंवा चहा पिऊन घरीं परत जावयाचें असा त्यांचा क्रम असे. कधीं सहस्रबुद्धे, कधीं रविकिरण मंडळाचे सभासद, कधीं इतर मित्र मंडळी यांचेघरीं हा वार्षिक समारंभ होई. या वेळीं त्यांच्या उत्कट हसण्यांतहि विषादाची छटा दृग्गोचर होई.

१९२९ पूर्वींचा त्यांचा स्नेह १९२९ नंतरहि भूमितिश्रेणीनें वाढत गेला. त्यांच्या येण्यानें सर्वांची, गड्यांचीसुद्धां मनें उल्हसित होत, ठराविक खुर्चीवर बसून वहिनीच्या पाकचातुरीची ठराविक शब्दांत स्तुति करतांना औपचारिकपणा मुळींच न दिसता त्यांचा सर्वांविषयीं आपलेपणा दिसून येई.

स्वतःच्या मर्यादित जीवनांत प्रत्येक गोष्ट विचारपूर्वक मन लावून व शक्य तितका आनंद अनुभवित करणें हेंच त्यांच्या जीवनाचें व लेखनाचें रहस्य होतें.

१९३० सालीं त्यांनीं आपल्या सर्व रोजनिशा फिरून वाचवयास काढल्या, त्यांतील कांहीं उल्लेख उघड, लोकांना लागणारे, मागें ठेवण्यास धोक्याचे असें वाटल्यावरून, मजकूर गाळून दिवाकरांनीं फिरून रोजनिशा सुधारून, वाङ्मयी पेहराव चढवून लिहिण्यास आरंभ केला. पूर्वींच्या रोजनिशांतून मधून मधून महत्वाचा मजकूर सांगितला असल्यामुळें, यासाठीं जेव्हां जेव्हां गांठ पडे, तेव्हां तेव्हां गाळलेल्या मजकुरासंबंधीं सांगतांना ते अत्यंत गंभीर होत.

एकदां त्यांनीं एक बंद पाकीट आणून दिलें. त्यांत १९१४ सालीं आमच्या लग्न प्रसंगीं उधळलेल्या पण गोळा करून जपून ठेवलेल्या मंगलाक्षता होत्या ! त्या पाकिटाचा मी स्वीकार केला तेव्हां आम्हां दोघांची अंतःकरणें एका विलक्षण विचारानें थरारलीं !

१९११ ते १९१६ पर्यंत नाट्यछटा, नाट्यसंवाद, नाटिका असा लेखन विस्तार करून पुढें १९२३ पर्यंत दिवाकरांची प्रतिभा हातपाय गुंडाळून बसली. मनांतल्या मनांत पुटपुटत, कातावत, भांडत, टोंचणी लागत अंतर्मुख होऊन लिहूं लागली. आस्तें कदम पण अविरत वाचन चाललें होतें. परंतु वाढतें वय व वाढतें वाचन याबरोबर वाढत असलेली महत्वाकांक्षा मनाला सलत होती. पोटापुरता पैसा व बेताचें शिक्षण असल्यामुळें मानाची व अधिकाराची जागा नसल्यामुळें बुद्धिपुरस्सर नाहीं तरी समाजाकडून थोडीतरी उपेक्षा होते. अतिपरिचयात् अवज्ञा शाली किंवा योग्यतेचें मनासारखें चीज झालें नाहीं म्हणजे जातिवंत लेखकाला न्यूनगंड झाल्याची उदाहरणें प्रत्यही दिसतात. अशाच प्रकारची मनोवृत्ती दिवाकरांत उतरली होती.

वाचकांची गैरसमजूत होऊं नये म्हणून येथें थोडा खुलासा करणें अवश्य आहे. हल्लींच्या तरुण पिढीवरून मागच्या पिढीच्या तरुणांची मनःस्थिती समजणार नाहीं. १९१० सालीं वयाच्या एकविसाव्या वर्षी एका वर्षीं १७००० पानें वाचणारा, कै. वासुदेवराव पटवर्धनांसारखा अव्वल सुधारक, काव्य-मर्मज्ञ, रोमांटिक गुरुचा पट्टशिष्य, सहस्रबुद्ध्यासारख्या कर्त्या सुधारकांचा बाल स्नेही, दुसऱ्या कुलांत दत्तक जाऊनहि साधारण गरिबींतच राहिलेला, मॅट्रिक नव्हे तर नोकरीस उपयोगी म्हणून स्कूल फायनल पास झालेला, कचेरींत खर्डेघाशी करणारा तरुण विवाहबद्ध होतो. वाणीचें पुरें सामर्थ्य नसल्यामुळें स्वतःच नवीन वाङ्मयप्रकार निर्मा ( करून आपले सुस्कारे, आशानिराशा, जगाविषयींचा Cynicism उद्रेकाबरोबर बाहेर सोडतो. भग्न झालेले मनोरथ अतिरंजित

आला, आला, संयुक्त महाराष्ट्र आला !!



भटाला दिली ओसरी......

निदान मुंबईकरांना तरी वाणकोट परका नाहीं. कारण मुंबईकर गृहिणींच्या दैनंदिन सांसारिक जीवनांतील कष्टप्रद असा वाटा हा बाणकोटी बाल्या उचलतो. मुंबईपासून कांहीं तासांच्या अंतरावर असणाऱ्या या प्रदेशाच्या भाषेचा हा नमूना–

वाणकोटी भाषा— **भाषा मराठीच**

( खालील संवाद दोन मुसलमानांमधील आहे. )

**पहिला**—सलाम् आलेकम्.

**दुसरा**—आलेकू सलाम.

**पहिला**— काय चिच्या, व्येस हैना ! खिकरशी ऐलांव् ?

**दुसरा**—आमी कापूर्शी ऐलूं; गुरुबावाहिक्रे गयेलूं हुतूं. तुमला खिकरे जायाचां हाय ?

**पहिला** आमला कापांत वकीलाहिक्रे जायाचां हाय. चुकटो वकील कोन हैय बरी ?

**दुसरा** –काय तंटो तरी काय हैय !

**पहिला** – तंटो मोटो लई सांगन्यासारखो नाय, अल्पट् हाय. दीरदोन रुपिये किमतीचा येक भेंडीचां झार् आमी तोड्लांव. त्येचो आमवर आमच्यो धुबरीच्या पुतुस्नी दावो घत्लान् हाय. आमला समान् बी लागलां हाय. भ्येस्तरवारची तारीख हाय. तवां आज मोट्रिशीं जातूं.

**दुसरा** – बरां तर ! तो बरिया ( बर्वे ) वकील है नाय ?. त्यो तुमच्यो चिच्याच्यो टाबराणाशीं ? त्यो मोटा चुकटो बोलणारो हाय. झुट्टो भांडण पर चुकूटा भांडवील बरा बसा. आमी जातूं.

करून काल्पनिक वातावरण निर्माण करतो. स्वार्थीबुद्धीनें स्वतःची इच्छा पूर्ण करण्याचे मार्ग न शोधता आपल्या बरोबर आयुष्य कंठणाऱ्या सोबत्याची कींवच करतों. अशा परिस्थितीच्या मनःस्थितीच्या पायावर उभारलेलें १९११ ते १९१४ पर्यंतचे लिखाण दिवाकरनीं पुरवून छापलेलें आहे, स्वभाव-धर्मानुरूप आलेल्या एखाद्या प्रासंगिक विचाराचा धागा धरून कुठें कुठें त्यावरुन सुतानें स्वर्ग गांठून एखादे भीषण चित्र उभें केलें आहे, तर कोठें दियवभोंवतीं पतंग उडत आहेत असें सुखस्वप्न चितारलें आहे.

रविकिरण मंडळाचे सदस्य या नात्यानें त्यांनीं रविवारच्या चहापानांत व काव्यचर्चेत भाग घेतला. किरणांत त्यांच्या नाट्यछटाहि प्रसिद्ध झाल्या. पण पुढें कवि माधव जूलियन यांचेवर जें काहूर उठलें त्याची झळ यत्किंचितहि आपणांस लागूं नये या इच्छेनें त्यांनीं रवि-किरण मंडळ सोडलें; पण सदस्यांची मैत्री सोडली नाहीं. अनंततनय, बापूसाहेब चाफेकर यांच्याप्रमाणेंच दिवाकरांचाहि र. कि. मंडळा-वर लोभ होता.

१९२३ ते १९२७ सालापर्यंत त्यांचा माझा संबंध मी परगांवीं असल्यामुळें कमी आला; पण या वेळांत त्यांनीं तीनच नाट्यछटा लिहिल्या. त्यापैकीं ' तेवढेंच ज्ञानप्रकाशांत ' या नाट्य छटेनंतर त्यांची एका बड्या साहि-त्तिकाशीं जुनी मैत्री तुटण्यापर्यंत पाळी आली. पण दोघानींहि पुन्हां मैत्री अबाधित राखली. ' तुम्हीं लोकांची छिद्रें काढतां, तुमच्या लघु-नाट्यछटा व त्यावर तुम्ही घेत असलेली मेहेनत यावर नाहीं का टीका करतां येणार ?' असें म्हणून मीहि ज्ञानप्रकाशच्या काव्यशास्त्र-विनोदांत लक्ष्मीधर या सहीनें ' आमचा खास बातमीदार ' हें नाट्यछटेचें विडंबन लिहीलें.

पण त्यांच्या कोमल मनाला वाईट लागलेलें दिसतांच मी त्यांची क्षमा मागितली व त्यांनीहि उदार मनानें केली.

या काळांत त्यांनीं पांच नाट्यछटा लिहिल्या. त्यांतील ' अहो मला वाचतां येतंय ' ही कथा लोयप्रिय आहे. पण ' पोराचा नाद आहे झालं ' व ' दिवा मोठा कसा झाला ' ह्या नाट्यकथा दिवाकरांना जास्ती आवडतात. ' दिवा मोठा कसा झाला ' या नाटय कथेंत त्यांना व मला आलेल्या दोन भासात्मक अनुभवाचें एकत्रीकरण आहे. रत्नाकरांत प्रसिद्ध झाल्यावर त्याचा off prints त्यांनीं मला मुद्दाम आणून दिला. १९२८ ते १९३१ च्या अवधींत लिहिलेल्या थोड्या लेखांपैकीं बहुतेक नाट्यात्मक आहेत. स्वतःच्या अनु-भवाचें असें त्यांत कांहीं नाहीं.

' आले कुठून—' ही नाट्य कथा लिहि-तांना दिवाकरांचा कल गूढाकडे झुकत होता. आकस्मित मृत्यू आला नसता तर त्यांनीं कदाचित् ' आंधळें, प्रवासी, निजलेलें मूल, ऐट करूं नकोस ! ' या प्रकारचें लेखन जास्त केलें असतें, असें वाटतें. दिवाकरांनीं प्रथम लिहीलेलीं दोन नाटकें, एक फाउस्टचें रूपांतर व दुसरें अर्धवट लिहिलेले—मेलेल्या मनुष्याचा आत्मा परत आल्याचें—फाडून टाकलीं. ' मी माझ्याशीं...' यांतले लेख नाहींसे केले. रोजनिशींतील उल्लेखांचा माग-मूस राहूं दिला नाहीं; पण त्यांचे एका संध्याकाळचे उदास उद्गार माझ्या मनावर कोरले आहेत. ते म्हणाले, " आपण धडपड करतों, विचार करून जाऊं लागतों, पण आपल्या मागें तिसरेंच कोणी आहे. लहान-पणापासून जी गोष्ट हवीशी पण दुष्प्राप्य होते ती एखाद्या अघटीत घटनेनंतर आटोक्यांतली वाटते; आपली कुवत न जाणतां आपण तिची हांव धरतो, तिच्यासाठीं जीव टाकतों, आतां ती आपणास मिळून असंभाव्य गोष्टी शक्य होणार तोंच असा एक तिऱ्हाइत मनुष्य आपल्या आयुष्यांत येतों, मित्र बनतो, आपण त्याच्याजवळ आपलें हृद्गत ओततों, आणि आपलें मनोरथ पार रसातळाला नेऊन आपल्य जीवनाचें वैराण वाळवंट करून पुन्हां आयुष्यांतून पार नाहींसा होतो ! " असे यांचे प्रतीकात्मक उद्गार होते. हा मैत्रीचा मृत्यू त्यांच्या मनाला फार वेदना देत असे. दिवाकरांनीं नैतिक दृष्ट्या आपलें आयुष्य अत्यंत सोज्वल घालविलें. १९३१ च्या ऑगस्ट–सप्टेंबरमध्यें पुण्यांत एक उत्कृष्ट-पैकीं रंगीत चित्रपट आला होता. तो पहा-ण्याचा त्यांना आग्रह केला असतां मुलीला घेऊन जावयाचें त्यांनीं कबूल केलें पण तो बेत तसाच राहीला.

जुलै, ऑगस्ट १९३१ चे सुमारास त्यांना दोन तीन विलक्षण स्वप्नें पडून ते अस्वस्थ

[ पान ५० वर चालू ]

# आमचें स्टीलचें कपाट

— बाळ गाडगीळ

त्या रात्रीं मी कपाट, कॉट, कोळशाचें पोतें आणि बंब यांच्यामध्यें मोकळ्या राहिलेल्या फटींत वांकडातिकडा होऊन झोपलों. तेव्हां माझ्या शरीराला 'ळ' या अक्षरासारखा छानदार बांक आला होता.

**लो**खंडे पितळे अँड को. च्या दुकानांत मी धापा टाकीत शिरलो आणि काउंटरजवळ उभा राहून घाम पुसूं लागलो. सुट्टीच्या दिवशीं आणि तें सुद्धां भर उन्हांत सरूनें मला घराबाहेर काढलें होतें आणि माझ्या गरीबबिचाऱ्या सेव्हिंग अकौंटमध्यें ती चारपांचशे रुपयांचा भलामोठा खड्डा पाडणार होती. या कल्पनेनें मला जास्तच उकडूं लागलें. उकडून अगदीं जीव गलबलून गेला. पण सरूला मात्र तसें कांहींच वाटत नव्हतें. समोर उभ्या असलेल्या स्टीलच्या कपाटांच्या रांगाच्या रांगा पाहून तिला उलट छान, थंडगार वाटत असावें.

तिचा लपूं न शकणारा तो उत्साह पहातांच दुकानांतला सराईत सेल्समन एकदम पुढें धांवला.

"काय दाखवूं बाईसाहेब? लहानशा चुकांपासून तो मोठ्या कपाटापर्यंत सर्व वस्तू दाखवितो." त्यानें आकर्ण हास्य केलें.

"म्हणजे अगदीं from pin to elephant असं काम आहे आमचं. हीः हीः..." हत्तीएवढ्या आकाराचे दुकानाचे एक पार्टनर मि. लोखंडे यांनी लोखंडी जोक केली. "आतां चुका कीं कपाट हें मात्र तुम्हीं ठरवायचं." हीच जोक मालकानें अनेकदां केली होती हें निःसंशय. कारण सेल्समन् ती ऐकून मख्खासारखा उभा राहिला.

सरूकडे न पहातां मी म्हणालो, "चुका आम्हीं घरींच करतो. आम्हाला हवं होतं एखादं कपाट" आतां मात्र तो सेल्समन् दिलखुलास हंसला.

माझी ही कोटी सरूनें एरवी सहजासहजी वाया जाऊं दिली नसती. पण आज स्टीलचीं तीं सुंदर कपाटें पाहून ती पार विरघळली होती.

"व्वा व्वा. हा तुमचा बेत मात्र आम्हाला आवडला. चला, कपाटंच कपाटं दाखवतो तुम्हाला. अगदीं नवा माल आला आहे. अगदीं hot cakes..." एकंदरींत लोखंड्यांना इंग्रजी शब्दांचीही आवड होती असें दिसलें.

"हें चार बाय सातचें तुम्हाला आवडेल. म्हणजे क्वालिटी अशी आहे कीं तुम्हीं बोलूंच नका. घेऊनच चला."

"अय्या, काय सुंदर आहे नै."

"भयंकर सुंदर आहे बुवा." बायकोलाही मी कित्येकदां भयंकर सुंदर असें म्हणत असे, त्यामुळें तिला जरा शंका आली.

"चेष्टा नै, खरंच म्हणतोय् मी."

पण तेवढ्यांत माझ्या लक्षांत आलें कीं आपण या लोखंड्याच्या तोंडावरच कपाटाची स्तुति केली तर नक्कीच हा किंमत वाढवून सांगेल. म्हणून मी तिला हळूच एक चिमटा घेतला आणि कपाटाची स्तुति न करण्याबद्दल तिला मंद्रसप्तकांत बजावलें. "ए गाढवे तो ऐकेल ना..."



अनुक्रमणिका

" अयाई ग, केवढ्यांदा चिमटा घेतलांत. दुष्ट कुठले. एखाद दिवशीं झटकन् प्राण गेला म्हणजे रडत बसाल..."

सुदैवानें श्री. लोखंडे कपाटाचा आवाज करण्यांत गुंतले होते म्हणून पतिपत्नींचा हा प्रेमळ संवाद त्यांना ऐकूं गेला नाहीं.

शेवटीं लोखंड्यांनीं तें कपाट उघडलें.

" बघा बाईसाहेब. आंतून एकदां पाहून घ्या."

" काय हो पण रंग पक्का ना ? "...

" पक्का म्हणून काय विचारतां ? कपाट मोडेल पण रंग जाणार नाहीं..."

" स्टीलच्या रसामध्येंच तुम्हीं बहुधा रंग घालत असाल. मग कसा जाईल रंग ! " कुठल्या तरी डायजेस्टमध्यें वाचलेलें हें माझें अ-सामान्य ज्ञान.

" तर मी काय म्हणत होतो हें तुम्हीं आंतून पहा एकदां. बाई-साहेब, कपाटांत तुम्हीं सहज उभ्या राहूं शकाल. तुम्हींसुद्धां सहज मावाल यांत साहेब."

५ फूट एक इंच बायको ७ फूट उंचीच्या कपाटात मावणें हें अगदीं साहजिक होतें. मग हें आपणाला मुद्दाम दाखविण्यांत याचा हेतू काय असावा ?

मी लोखंड्याकडे प्रश्नार्थक मुद्रेनें पाहिलें. तेव्हां त्यानें कपाटाला कुलूप लावल्याचा आविर्भाव केला.

अहो मलाही बायको आहेच कीं, बायकोला कोंडून ठेवायला या कपाटाचा किती छानदार उपयोग होईल हें दाखवतोय् मी तुम्हांला. त्या एका आविर्भावांत लोखंड्यानें इतक्या गोष्टी मला सांगितल्या. यावर मात्र मला आपलें हंसें आवरतां आलें नाहीं.

" फीः फीः..." करून मी हंसलोच आणि एकदां हंसल्यावर मी जास्तच हंसायला लागलो. बायकोला आपण खरोखरच कपाटांत कोंडली आहे असं वाटून मला गुदगुल्या व्हायला लागल्या.

" बरं पुरे करा आतां. काय हंसताय् चहाटळासारखं..." सरूनें मघाचचा चिमटा मला परत केला. आणि बायकोला कोंडून ठेवण्यासाठीं कपाट ही फारच उपयोगी वस्तू असल्याबद्दल माझी खात्री पटली.

मग आम्हीं दोघंही आळीपाळीनं आणि नंतर एकदम कपाटांत जाऊन उभे राहिलों.

पण कधीं कधीं बायकोला डांबून ठेवायला उपयोगी पडल्याशिवाय आणखी कोणत्या वस्तू आंत ठेवतां येतील हें महत्त्वाचें आहे हें माझ्या ध्यानांत आलें. " दुसरें काय याच्यांत ठेवतां येईल ?..."

" काय येणार नाही हें विचारा त्यापेक्षां. सिल्क आणि वूलनचे सूट्स्, टाइज्, बाईंची सिल्क, नायलॉन आणि जरीचीं पातळें, दागिने, पैसे...शिवाय तुमच्या बाबाचे कपडे...शिवाय कांहीं किंमती वस्तू...कांहींही..."

या सर्व वस्तू कपाटांत ठेवण्या आधीं त्या विकत घेणें आवश्यक होतें. खरें म्हणजे यावर अगोदर चर्चा झाली होती. पण एकदां कपाट घेतल्याशिवाय आंत ठेवायच्या वस्तू घेतल्या जात नाहींत अशी माझ्या सासूबाईंची ' थिअरी ' होती.

" म्हणजे कपाटाबरोबरं हा आला कां आणखी दोन तीन हजा-रांचा खड्डा ! हिच्या निरनिराळ्या पातळांशिवाय आहे काय यांत ठेवायला ? "

" तें तुम्हीं अगदीं सांगूं नका साहेब. लोखंडे पितळे कंपनीच्या कपाटांचा पायगुणच असा आहें कीं एकदां कपाट घेतल्यावर आपो-आपच पैसे घरांत यायला सुरूवात होते. "

एवढी चांगलीं कल्पना सरूला एकदम पसंत पडली यांत कांहींच आश्चर्य नव्हतें.

तेवढ्यांत लोखंडे तिजोरी घरांत असण्याचें महत्त्व सांगूं लागले. तिजोरीचें लोकांच्या दृष्टीनें महत्त्व मला अर्थातच मान्य होतें परंतु अंगडी आणि सोन्याचीं बटणें ठेवण्यासाठीं माझ्या दृष्टीनें सोईस्कर अशी जागा टेबल किंवा खुंटाळें ही होती. तिथेंच या वस्तू मला न शोधतां सांपडत असत. बरें मौल्यवान् वस्तू ठेवण्याची ही गुप्त जागा माझी बायको, मोलकरीण आणि शेजारची मुलें या निवडक लोकां-खेरीज कोणालाच माहित नव्हतीं. त्यामुळें तिजोरी ही अवघड आणि असुरक्षित जागा मला बिलकुल पसंत नव्हती.

" कायहो, पण टिकाऊ आहे ना ?...एकदांच घ्यायच्या असतात असल्या वस्तू..."

" साहेब, टिकाऊ म्हणून काय विचारतां ? कपाट घेऊन जा. सात पिढ्या मरण नाहीं त्याला. एकवेळ रंग जाईल पण कपाट मोडणार नाहीं. "

" अहो, रंगाबद्दल हेंच म्हणालांत तुम्हीं. "

" तेंच अजूनही म्हणतो कीं, कपाटही मोडायचं नाहीं आणि रंगही जाणार नाहीं. पण मी म्हणतो असं कशाला ? तुम्हीं या कपाटावर उभें राहूनच पहा त्याशिवाय नाहीं खात्री व्हायची तुमची."

माझ्या संमतीची वाटही न पाहतां नोकरांच्या साहाय्यानें लोखं-ड्यानीं तें कपाट पाडलं.

" हं रहा आतां उभे..."

" अहो, पण मीं उभा राहून काय होणार आहे ? "

" नाहीं पण साहेब तुम्हीं उभे रहाच. आणि कपाट मोडलं तर कानच धरा माझा. म्हणजे झालं. "

मला त्याचा कान धरायलाच काय पण चांगला खेचून लांब करायला आनंद झाला असता. पण—

मी नको नको म्हणत असतांही लोखंडे आणि तेवढ्यांत आलेल्या पितळ्यांनीही मला आग्रह केला आणि नाइलाजानें डगडगत तोल सांवरत मी एकदांचा वर जाऊन उभा राहिलो.

" अहो पण माझं वजन तें असं काय ? त्यापेक्षां तुम्हीं बाईनाच कां नाहीं उभ्या रहायला सांगत ? "

मी कपाटावर उभा नसतो तर यावेळीं एका सणसणीत चिमट्यां-तून कांहीं मी वाचलो नसतो.

" अगदीं खोट्ट. यांचंच वजन माझ्यापेक्षां जास्त आहे हो..."

" तसं कशाला बाईसाहेब. तुम्हीं दोघंही उभे रहा ना वर. कपाटाला कांहीं मरण नाहीं..."

आतां मोठीच पंचाईत झाली. शेवटीं तीहि वर चढून माझ्या




शेजारीं उभी राहिली. आणि तिच्या वाढत्या वजनाची त्यावेळेपुरती कां होईना मला खरोखरच काळजी वाटूं लागली. न जाणो...

"आतां कॅमेरा पाहिजे होता, नाहीं ! फोटो तरी काढला असता. पण तुम्हाला मेली हौसच फार ना. लग्नांतलासुद्धां फोटो नाहीं आमच्याजवळ..."

"सरू, अग फोटो म्हणजे चार लोकांनीं पहावा या हेतूनें काढायचा असतो." माझें बोलणें सुद्धां कधींकधीं खोचक होऊं शकतें.

"म्हणजे तुमचं सोडा पण मी दिसायला इतकी का कुरुप आहे ?" सरू असल्या बोलण्यांत मलाच काय शिवरामपंतांनासुद्धां हार गेली नसती.

"अरे हो, आणखी एक गोष्ट तुम्हाला सांगायची राहिलीच कीं," आमचं जें संभाषण रंगूं शकलें असतें त्याला लोखंड्यानें खीळ घातली. "अच्छा, ती काय बुवा !" "अय्या, ती कोणती बाई !" "या कपाटाची स्पेशॅलिटी ही कीं तें कॉन्व्हर्टिबल् आहे. याचं छानदार टेबलही तयार होऊं शकतं. पण होऊं शकतं असं म्हणण्यापेक्षां तुम्हाला दाखवलेलंच काय वाईट ! पहा आणि खात्री करा हाच आमचा मोटो आहे."

मधें उभं केलेलं कपाट परत खालीं पाडण्यांत आलं. त्याच्या बाजूच्या पट्ट्या काढून त्या खालीं जोडण्यांत आल्या आणि कपाटाचं डायनिंग टेबल झालं. "आणखी फक्त दोनशे रुपये घातलेत की चार खुर्च्या. म्हणजे कंप्लीट सेट झाला..."

कपाटाचं टेबल व्हायला दुकानांतल्या हत्यारांसह सुमारे पाऊण तास लागला. अर्थात् घरीं हें काम करणें जमलें नसतें किंवा जमल्यास दोन तीन तास सहज लागले असते.

"अहो एवढं सगळं झालं पण किंमतीविषयीं आपण कांहींच बोललो नाहीं...."

"किंमतीचं कांहीं मोठंसं नाहीं हो. माल तुम्हाला पसंत पडला कीं त्यांतच आमचं समाधान..."

"नाहीं, पण किंमतीचं एकदां ठरलं म्हणजे बरं..."

"किंमतीचं असं आहे. आरशासकट फक्त साडे पांचशे आणि आरशाशिवाय फक्त साडे चारशे..."

डालमिया, मुंधरा इत्यादी थोर लोकांचीं प्रकरणें मी अनेकदां वाचलीं असल्यामुळें साडे पांचशे आणि साडे चारशेच काय पण कोटी आणि दशलक्ष या संख्यांच्या मागेसुद्धां 'फक्त' हा शब्द वाचायची मला संवय झाली होती.

"अरे बापरे फक्त साडे पांचशेच ! मग आम्हीं असं करतो कीं आरसा सध्यां घेत नाहीं. म्हणजे फक्त शंभर रुपये कमी पडतील..."

सरूला माझा हा चिक्कूपणा पसंत पडला नाहीं. पण पुढें मागे हट्ट करून आरसा घेतां येईल. असा सूज्ञपणाचा विचार तिनें केला आणि तिनें फारशी नाखुषी व्यक्त केली नाहीं. दुकानदारानेंही एव्हांना आमची ताकद ओळखलीच होती. आरशाचे भाव वाढल्यावर हाच आरसा या लोकांना जास्त किंमतीला विकतां येईल असाही विचार त्यानें केला असावा.

रंग गेला तरी न मोडणारें, मोडलें तरी रंग न जाणारें, आम्हीं दोघें उभे राहिलो तरी न वाकणारें, आमच्याजवळ नसलेल्या अनेक वस्तू ठेवतां येण्याजोगें आणि शिवाय दोनतीन तास खटपट करून ज्याचें टेबल बनवितां आलें असतें इतकें उपयोगी असलेलें तें कपाट न घेणें अशक्यच होतें. फक्त ४५० रुपये मोठ्या आनंदानें (मी कांहींशा दुःखानेंही) देऊन आम्हीं त्या कपाटाचे मालक बनलों.

चाळीच्या चक्रव्यूहांतून कपाट घरीं आणणें हा फारच बिकट प्रश्न होता. पण सुदैवानें लोखंडे पितळे आणि कंपनीनें ती जबाबदारी स्वीकारली. त्यामुळें आम्हाला प्रत्यक्ष असा त्रास कांहींच झाला नाहीं. कपाट आणतांना शेजारच्यांनीं हौसेनें केलेल्या फुलबागेंतल्या फुलांच्या कांहीं कुंड्या फुटल्या, पलीकडच्या बिऱ्हाडांतल्या काकूंना कपाटाचा धक्का लागून त्या पडल्या आणि त्यांचा एक दांत पडला (वास्तविक तो अगोदरच हलत होता) कांहीं लोकांच्या वाळत घातलेल्या कपड्यांना डाग पडले तर कांहींचे फाटले आणि भिंतीचा चुना दोन चार ठिकाणीं कोसळला. असें लोकांचें कांहीं किरकोळ नुकसान झालें.

कपाट घरांत येऊन पोंचतें न पोंचतें तोंच मागील दारानें शेजारच्या बिऱ्हाडांतल्या चंपूताई, रेखाबाई आणि सुधामाई या आमच्या घरांत धांवल्या.

"अगदीं पत्तासुद्धां लागूं दिला नाहींत हो सरुताई !"

"इश्श् त्यांत काय सांगायचंय्. मेली साडेपांचशांची तर गोष्ट. म्हटलं एकदां घेतलं कीं दाखवायचंच आहे..."






" बरं तें राहूं द्या हो. पण आतां एक छानशी आइस्क्रीम पार्टी झाली पाहिजे. "

" तुमच्या मशीनची पण राहिलीय हो पार्टी. तुम्हीं विसरला असाल पण आम्हीं नाहीं हो..."

" आइस्क्रीम आहेच हो. पण मला बाई बरं वाटतं तें हें कीं त्या वासंतीचा उगाच तोरा चालला होता—कपाट कपाट म्हणून, तो एकदांचा बंद पडेल. मी यांना म्हटलंच तें कांहीं नाहीं. थोडा त्रास झाला तरी हरकत नाहीं. पण हिचं नाक खालीं झालं पाहिजे. आतां आणखी एकेक वस्तू घेते अन् मग पहात बसा म्हणावं. तीन रूम्सचे ब्लॉक्स म्हणावं हज्जारो पडलैत. आणि कस्टममधली नोकरी म्हणजे तरी कांहीं अगदीं स्वर्ग नव्हे. "

" आरशाचं तेवढं राहून गेलं हो सरूताई..."

" करायचा काय आरसा. उगीच फुटायला कहार मेला. हे म्हणत होते काय शेपन्नास व्हायचे असतील खर्च ते होऊन जाऊं द्यात. पण मीच म्हटलं नको बाई..."

" त्यांचं सातशाचं आहे म्हणतात..."

" ठेवलंय्. अहो, कसले आले आहेत सातशे. चारशांनंसुद्धां वाटत नाहीं हो. अन् कुणाला माहिती त्यांनीं पैसे तरी दिले कीं नाहीं तें—दिलं असेल झालं एखाद्या व्यापाऱ्यानं तसंच..."

" त्यांतले नाहींत हो. फार कडक आहेत म्हणे ते..."

" अहो कसले कडक अन् कसले काय ? हे म्हणतातच ना—पैसा म्हटला कीं सगळे विरघळतात..."

संभाषण संपेल म्हणून मोठ्या आशेनं मी खोलींत उभा होतो. पण तसें कांहीं चिन्ह दिसेना म्हणून मी प्रथम हळूच आणि नंतर मोठ्यांदा खांकरलो. आणि ' शेजारीण ' या विषयावर सरू आणि तिच्या मैत्रिणीमध्यें चाललेला तो सोज्वळ संवाद दुसऱ्या दिवशीं पुढें होण्याकरितां थांबला...

नवें कपाट आलें त्यामुळें आमच्या घराला भलतीच शोभा आली. येथें ' आमचें घर ' या फसव्या शब्दांचा अर्थ सांगितला पाहिजे.

१०'×१०' या आकाराची एकच खोली आमच्याकडे होती आणि त्यांत रेडिओ, कॉट्, टेबल, तीन खुर्च्या, ट्रंका, बॅगज् संसाराचें किती तरी अत्यावश्यक सामान, बंब, कोळशाचें पोतें आणि राहिलेल्या जागेंत आम्हीं दोघेजण अशी वांटणी होती. कपाट घरांत घुसलेलें पाहून भयचकित नजरेनें या सर्व वस्तूंनी त्याच्याकडे पाहिलें.

कपाट आलें खरें पण तें कुठें ठेवायचें याचा विचारच आम्हीं केला नव्हता. पण आतां तें भलेंमोठें कपाट ऐसपैस घरांत येऊन बसल्यावर आपलें काय हा प्रश्न मला भेडसावूं लागला. तें डाव्या बाजूला दारांतच ठेवावें तर आंत येतां येणें शक्य नव्हतें, बरें बाजूला ठेवावें तर वाऱ्याची एकुलती एक खिडकी तिथेंच होती. खिडकीच्या बाजूला पलंग होता आणि तेथें स्वैपाकाच्या वस्तूंची सरहद्द सुरूं होत होती. विरुद्ध बाजूला बंब, कोळशाचें पोतें, बादल्या इत्यादि सरंजाम आटोपशीरपणें उभा होता.

" तरी मी तुला म्हणत होतो, कीं एवढ्यांत कपाट नको. नंतर दोन खोल्यांचा ब्लॉक मिळाला म्हणजे बघूं. "

" तुम्हाला मुळीं हौसच नाहीं कसली ! लग्न झाल्यापासून गेलीं दोन वर्षं चाललंय् कपाट घ्यायचं. म्हंजे तुम्हाला जागा मिळायला नको अन् आम्हांला कपाट घ्यायला नको..."

" अग असं काय करतेस ? पण कपाटापेक्षां पाळणा वगैरे गोष्टी जास्त महत्त्वाच्या नाहींत कां ? आतां पाळणा आणला म्हणजे तो कुठें ठेवायचा ? शिवाय बाबागाडी..."

" तुमचा चहाटळपणा सुरू झाला का पुन्हां. पाळण्याची वेळ येईल तेव्हां त्याची व्यवस्था होईल. त्यांतल्या त्यांत आटोपशीरपणें राहिलं म्हणजे सगळं जमतं. मी म्हणते तुमचं तें टेबलच काढून टाका ना !..."

" माझं टेबल तुझ्या डोळ्यांत खुपणार हें मला माहित होतंच. लेखक व्हायचं म्हणजे टेबलाशिवाय भागेंत वाटतं..."

" अहाहारे लेखक म्हणजे मु. रा. वि., चिमखडे बोल आणि संपादकांशी हितगुज हेंच तुमचें लेखन ना ? "

" हंस तूं मला, अन् माझी चेष्टाही कर. पण एकदां का पुस्तकं लिहायला लागलो अन् सरकारी बक्षिसं मिळायला लागलीं म्हणजे च ऽ ट् रडत येशील..."

" इश्श् रडायला काय झालं ? चांगलं बक्षीस मिळालं दोन हजारांचं तर मला कुठं नको आहे. कमाताईसारखा पंखा, दुर्गीसारखं शिवणाचं मशीन आणि मीनासारखा वॉटरगीझर मला घ्यायचाच आहे नाहीं तरी. अन् शिवाय वॉशिंग मशीन राहिलंच कीं. मावशीच्या मिनीचा नकशा नाहींतरी मला उतरवायचाच आहे...अस्सा चेहरा उतरेल आपलं मशीन पाहिल्यावर..."

सरूच्या जागीं मला वॉशिंग मशीन, गीझर, शिवणाचं मशीन, पंखा इत्यादि आयुधें घेतलेली अष्टभुजा देवी दिसूं लागली. त्या धसक्यानें पहिलें बक्षीस मिळविण्याचा विचार मी तूर्त तरी रद्द केला.

" अग पण असं काय करतेस. पाहुणे आले म्हणजे काय त्यांना माळ्यावर कां झोपायला सांगणार आहेस ? या घरांत आतां पाऊल ठेवायलासुद्धां जागा शिल्लक नाहीं. आतां तुझा तो भाऊ..."

" बरोबर याचवेळीं बाहेरचं दार खडखडावलें गेलें आणि

( पान ४१ वर पहा )

आला आला संयुक्त महाराष्ट्र आला !



नेहरूकाका मला वांचवा !

## मूर्ति लहान कीर्ति थोर

हरघडीच्या जीवनांत अशा कांहीं क्षुद्र वस्तु असतात कीं ज्यांच्या वाचून आपलें पदोपदीं अडतें. या वस्तु क्षुद्र असल्या तरी त्यांचा इतिहास इतका विलक्षण असतो कीं तो वाचून आपल्याला आश्चर्य वाटेल.

या सदरांत नियमितपणें अशाच कांहीं गमती आम्हीं सादर करणार आहोंत—



### सेप्टीपिन

१८४९ सालच्या एका हिंवाळ्यात न्यूयॉर्क शहरांत वॉल्टर हंट नामक एक संशोधक आपल्या कारखान्यांत कसला तरी विचार करीत बसला होता. हातांत उगाचच चाळा म्हणून पितळेच्या तारेचा एक तुकडा होता. एका गृहस्थाला आज दुपारपर्यंत १५ डॉलर्स परत करावयाचे होते. तो त्याच्या घरीं गेला आणि एवढी रक्कम कशी उभी करावी हें त्याला सुचेना. त्या गृहस्थाच्या दिवाणखान्यांत अशाच येरझारा घालीत असतांना त्याला एक कल्पना सुचली. तो आपल्या कारखान्यांत गेला आणि मघाशीं सहज चाळा म्हणून हातात घेतलेली तार त्यानें उचलली. त्या तारेचा त्यानें 'U' अक्षरासारखा आकार केला. 'यु' या U च्या बुडाशी एक वेटा दिला—आणि त्याची लगेच एक सेफ्टीपिन बनवली. तीन मिनिटाच्या आंतच वॉल्टर हंटनें सेफ्टीपिनचा शोध लावला. या पिनचें पेटंट त्यानें एका फर्मला ४८० डॉलर्सला विकलें आणि आपली सर्व कर्जफेड केली.

पण वॉल्टर हंटनें नुसती सेफ्टी पिनच बनवली नाहीं तर फौन्टन पेन बनवलं. फौन्टनपेन हें नांवहि त्यानेंच शोधून काढलें. शिवणाचं मशीन हा त्याचाच शोध.

### शिलाईचें मशीन

पण हंटरसारखा चमत्कारिक संशोधक इतिहासांत सांपडायचा नाहीं. त्याचं नशीबच असं कीं त्यानं शोध लावायचे आणि फायदा इतरांनीं मिळवायचा. १७९६ सालीं एका शेतकऱ्याच्या घरांत जन्मलेला हा संशोधक लहानपणींहि सबंध दिवस यंत्रांत गढलेला असे. त्याची आई सूत कातीत असे. तर एक दिवस छोट्या वॉल्टरनें तिच्यासाठीं एक छानदार सूत कातण्याचं यंत्र तयार केलं.

१८२७ मध्यें तो न्यूयॉर्कला आला. एक कारखाना काढून सूत कातण्याचीं छोटीं यंत्रं तयार करावींत म्हणून. पण एक दिवस रस्ता ओलांडीत असतां एका टांग्याच्या खालीं सांपडून तो जखमी झाला.- टांगेवाला घोड्याला चाबूक मारून आणि आरडाओरडा करीत लोकांना बाजूला व्हायला सांगत होता. हातपाय खरचटले होते पण वॉल्टर तसाच घरीं गेला. त्यानें एक नव्या प्रकारची घंटा केली. ती टांगेवाल्याच्या पायाशीं बसवून त्यानें फक्त पाय दाबला कीं घंटा वाजेल अशी त्यांत सोय होती. वॉल्टरची ही युक्ति न्यूयॉर्कमध्येंहि वापरांत आली आणि सर्वत्र लोकप्रिय झाली. आज ट्रॅममध्यें ड्रायव्हर जी घंटा पायानें वाजवतो तीच ही घंटा.

१८३२ मध्यें वॉल्टरनें जगांतील सर्वांत महान शोध लावला. आणि तो म्हणजे शिवण्याच्या मशीनचा शोध. त्यापूर्वी बार्थेलमी थिमोनीयरनें एक शिवणकामाचें मशीन तयार केलें होतें; पण त्यांत फक्त धांवदोरा घालण्याची सोय होती. पण वॉल्टरनें यापेक्षां आघाडी मारली आणि 'टीप' घालणारं मशीन १८३४ मध्यें तयार केलें. पण हें मशीन तयार करून त्यानें त्याचं पेटंट घेतलें नाहीं. कारण त्यामुळें शिवणकाम करणाऱ्या बऱ्याचशा स्त्रिया बेकार होतील असं भय त्याच्या बायकोनें व्यक्त केलें. पण नंतर पैशाची फारच चणचण भासूं लागली म्हणून त्यानें ते जॉर्ज ॲरोस्मिथला विकून टाकलें. पण एक दिवस तें आगींत जळून नष्ट झालें.

त्यानंतर गृहिणींची रोजची एक अडचण दूर करण्याच्या मागें तो लागला. आणि थोड्याच दिवसांत हंटनें स्टोव्हचा शोध लावला.

### फौन्टन पेन

१८४७ सालीं त्याच्या डोक्यांत कल्पना आली कीं आपण अशी एखादी लेखणी शोधून कां काढूं नये, कीं ज्यांत शाई अखंड भरलेली असेल. लागलीच तो कामाला लागला आणि त्यानें एक झरणी तयार केली. त्याचं पेटंट तयार करतांना या झरणीला त्यानें नांव दिलें 'फौन्टन पेन!' पण तें पेन बाजारांत टिकलें नाहीं. त्याच्यानंतर १८८४ मध्यें लुईस वॉटरमननें हंटच्या मॉडेलमध्यें सुधारणा करून नवें पेन तयार केलें आणि त्याला 'वॉटरमन' फौन्टन पेन असें नांव दिले. आज बाजारांत दिसणारें 'वॉटरमन' ते हेंच.

१८५४ मध्यें त्यानें 'पेपर कॉलर' चा शोध लावला. त्याचवेळीं हार्वर्ड सिंगरनें हंटला विनंति केली कीं आगींत जळालेल्या तुझ्या त्या शिवणमशीनसारखं दुसरं मशीन बनवून दे. त्यानें त्याप्रमाणें एक मशीन बनवून दिलें. सिंगर त्यावर एकदा खूप झाला कीं त्यानें पांच वर्षेपर्यंत दरवर्षी १० हजार डॉलर्स रॉयल्टी म्हणून हंटला द्यायचें कबूल केलें.

सिंगरचें हें औदार्य पाहून हंटच्या डोळ्यांतून घळघळा अश्रू वाहूं लागले. १८५८ सालीं कां होईना पण त्याच्या अनेक शोधांपैकीं एक शोध त्याला अमाप पैसे देणार होता.

पण हंट अखेर दुर्दैवी. या देणगीचा पहिला हप्ता मिळण्यापूर्वीच १८५९ सालीं तो मृत्यु पावला—

पण आमच्या हरघडीच्या जीवनांत क्षणोक्षणीं आपली स्मृति ठेवून गेला!

• • •

अनुक्रमणिका



*महाराष्ट्राचे सिद्धहस्त नाटककार, एके काळचे गाजलेले संपादक आणि चतुरस्त्र लेखक*

*श्री. मो. ग. रांगणेकर*

*यांनी*

माणसाला आयुष्यांत अनेक प्रश्न पडतात. आणि ते प्रश्न कुणाला विचारावेत असाहि त्याला प्रश्न पडतो. आपण आपले प्रश्न (प्रतिमहिन्याच्या दहा दिनांकापर्यंत) आम्हाला विचारा व त्याची खेळीमेळीनें दिलेली उत्तरे तितक्याच खेळीमेळीनें ऐकायची सिद्धता ठेवा. येथें घातलेली ही पाणपोई आहे. एरंडाचे गुऱ्हाळ नव्हे, हे सर्व त्रस्त तृषितांच्या ध्यानांत येईलच ! दर महिन्याच्या सर्वोत्कृष्ट प्रश्न विचारणाऱ्या मार्मिक वाचकाला आम्ही पांच रुपयांचे पारितोषिक देणार आहोंत. ह्या महिन्यांतील सर्वोत्तम प्रश्नाबद्दल बाळ गंगाधर सरवटे वसई यांना पांच रुपयाचें पारितोषिक देण्याचे ठरले आहे. त्यांना मनीऑर्डरीने पैसे पाठविले जातील.

# घातली ही पाणपोई

**बाळ गंगाधर सरवटे,** वसई

**प्रश्न — मला 'टिळकांच्या 'गीतारहस्या'सारखे पुस्तक लिहावयाचें आहे. काय केलें असतां मला हें साधेल ?**

**उत्तर—** आपलें इप्सित साधणें कठीण देसतें. आतां भारतांतील कैदी मंडालेच्या तुरुंगांत पाठविणें बंद झालें आहे.

**सौ. चारुशीला सांवरे,** नागपूर

**प्रश्न—नैसर्गिक मृत्यु चांगला कीं कृत्रिम मृत्यु चांगला ?**

**उत्तर—**विमा उतरला असल्यास कोणताही चांगला !

**राम हिरलेकर,** मुंबई

**प्रश्न—स्त्रिया 'इश्श' म्हणतात त्या जोडीचा पुरुषांचा शब्द कोणता ?**

**उत्तर—**तो छापण्यासारखा नाहीं. छापल्यास सरकार खटला भरील व कृष्णराव मराठे आत्महत्या करतील !

**र. रा. नाईक,** गोवें

**प्रश्न—देवळांत देवाच्या दर्शनाला जातांना वहाण बाहेर काढून ठेवावी लागत असल्यामुळें, देवापेक्षां वहाणेकडेच लक्ष लागून नीट भक्ति होत नाहीं. याला काय करावें ?**

**उत्तर—**परमेश्वर सर्वत्र आहे, तसा तो वहाणेंतहि आहे, असें मानावें म्हणजे झालें !

**सखाराम देशमुख,** जळगांव

**प्रश्न—वेदावर टीका करण्यांत ज्ञानेश्वरांचा कोणता हेतु होता ?**

**उत्तर—**माणसापेक्षां बैल श्रेष्ठ, हें दाखवून त्याला जनावरांची सहानुभूति मिळवायची होती असा तर्क आहे !

**केशव शिरसेकर,** मुंबई

**प्रश्न—तुम्हांला एक दिवस भारताचा पंतप्रधान केलें, तर तुम्ही काय कराल ?**

**उत्तर—**एक वर्षाचा पगार ॲडव्हान्स घेईन.

**प्रश्न—सम्राट पृथ्वीराज चव्हाण आणि मुख्यमंत्री यशवंतराव चव्हाण यांची तुलना करा.**

**उत्तर—**उद्यां वल्लभभाई पटेल आणि बाबूराव पटेल यांची तुलना करण्यास सांगाल !

**प्रश्न—पूर्वीचे आणि आजचे कवि यांच्यांत श्रेष्ठ कोण ?**

**उत्तर—**पूर्वीच्या कवींमध्यें आजचे कवि श्रेष्ठ व आजच्या कवींत आजचे कवि श्रेष्ठ !

**कु. लीला उपासनी,** कल्याण.

**प्रश्न—पुरुषाला दुसऱ्या पुरुषाची स्त्री नेहमीं चांगली कां वाटते ?**

**उत्तर—**कारण दुसऱ्या पुरुषालाही तसेंच वाटत असतें !

**आर. के. काळे,** कल्याण

**प्रश्न—डालडा तूप खाल्यामुळें सातवी पिढी आंधळी होते, हें सत्य आहे काय ?**

**उत्तर—**ब्रह्मचाऱ्यांच्या मतें—नाहीं !

**मा. ग. सोमण,** अकोला

**प्रश्न—माणसाच्या आयुष्यांत 'सुखांतिका' व 'दुःखांतिका' या शब्दांना कांहीं अर्थ आहे काय ?**

**उत्तर—** आहे तर ! लग्नापूर्वी सुखांतिका आणि लग्नानंतर दुःखांतिका सुरू होते !

**प्रश्न—उत्तम ज्योतिषाकडून मुहूर्त पाहून केलेले विवाहसुद्धां अनेकदा अयशस्वी ठरतात. मग हें ज्योतिषांचें थोतांड कशाला ?**

**उत्तर—** अपयशाबद्दल कोणाला तरी जबाबदार धरण्याकरितां !

**प्रश्न—चंद्रावर स्वारी केल्यानंतर 'मधुचंद्र' या शब्दाचा काय अर्थ होईल ?**

**उत्तर—**संसार !

**प्रश्न—कुठल्याही मंदिरांत आपण देवदर्शना करितां प्रवेश करतो, त्यावेळीं प्रथम घंटा वाजवतो ती कशाकरितां ?"**

**उत्तर—**कुणाच्याही घरीं गेल्यावर तुम्हीं दरवाज्याची 'बेल' वाजवीत नाहीं काय ?

**व. ल. ढवण,** मुंबई

**प्रश्न—आजकाल स्त्रियांची फॅशन फारच उच्च पातळीवर जाऊन पोहोंचली आहे, तेव्हां यापुढें फॅशन म्हणून कांहीं शिल्लक राहाणार आहे का ?"**

**उत्तर**—खात्रीनें !—जोंपर्यंत स्त्रीच्या अंगावर शेवटची चिंधी राहील तोंपर्यंत !

**प्रश्न—भारत सरकारच्या पंचवार्षिक योजनेंतील संततीनियमनाचा प्रश्न किती कुटुंबांना सुखी करूं शकेल ?**

**उत्तर**—हा आंकडा संतती नियमन केंद्रावर नेमण्यांत येणाऱ्या अधिकाऱ्यांच्या संख्येवरून सांगतां येईल !

**य. शं. देवधर, ठाणें**

**प्रश्न—केरळप्रमाणें इतर प्रांतांत तीन दिवसांत उठाव करूं, असें श्री. डांगे म्हणाले होते, त्याचें पुढें काय झाले ?**

**उत्तर**—'तीन दिवसांत रोग्याचा मुडदा पाडून दाखवतो,' असें सांगून 'एकच प्याल्यां'तल्या वैद्याला किती तरी वर्षे झालीं !

**भा. दा. उपासनी, मुंबई**

**प्रश्न—मनुष्य प्राणी या जगांत एक दिवस जन्माला येतो, कांहीं काळ जगतो, आणि मरतो. मग हा कशासाठीं एवढा खटाटोप ?**

**उत्तर**—तो जन्माला येतो म्हणून एक रेशन कार्ड जास्त मिळतें; तो जगतो म्हणून त्याच्या बायकोला हक्कानें त्याला छळतां येतें; आणि तो मरतो म्हणून एक 'व्हेकन्सी' होते !

**ना. चिं. देवधर, पुणें**

**प्रश्न—कौरव पांडवांच्या युद्धांत एक अब्ज सहासष्ट कोटींवर योद्धे धारातीर्थी पतन पावले म्हणतात. शिवाय त्यांच्या घरीं त्यांची बायकामुलें असणारच. म्हणजे त्यावेळीं एवढी प्रचंड लोकसंख्या होती काय ?**

**उत्तर**—अर्थात्. कारण त्यावेळीं डॉक्टर्स कुठें होते ?

**प्र. वि. कोतवाल, मुंबई.**

**प्रश्न—प्रीति-विवाहाबद्दल आपलें काय मत आहे ?**

**उत्तर**—प्रीतिबद्दल चांगलें आहे; विवाहाबद्दल—आपला विवाह झाला आहे काय !

**रुक्मांगद श्री. कंडीवाडे, बी. ए. विरार.**

**प्रश्न—प्रस्तुतचे सरकार आपलें असलें, तरी त्याबद्दल आपणास वाटावयास पाहिजे तितकी आपुलकी वाटत नाहीं, असें कां ?**

**उत्तर**—पुष्कळशा स्त्रियांची आपल्या नवऱ्यांबद्दल हीच तक्रार असते !

**प्रभाकर त्रेंद्रे, अंमळनेर.**

**प्रश्न—अक्षर वाङ्मय म्हणजे काय ? त्यादृष्टीनें कोणत्या कृती अक्षरवाङ्मयांत समाविष्ट करतां येतील ?**

**उत्तर**—अंकलिपी व इसापनीति !

**बा. ना. मानकर, दहिसर.**

**प्रश्न—मनुष्य अति सुखाच्या व अति दुःखाच्या प्रसंगीं डोळे कां मिटतो ?**

**उत्तर**—सुखाच्या वेळीं स्वतःच्या समाधानासाठीं; व दुःखाच्या वेळीं इतरांच्य समाधानासाठीं !

**प्रश्न—समानतेच्या या युगांत स्त्रीराज्य अस्तित्वांत आल्यास काय बहार होईल, नाहीं ?**

**उत्तर**—कुणाची ?

**ह. का. ठाकूर, बोरीवली.**

**प्रश्न—भारतांत शांतता व समता नांदण्यासाठीं लोकशाहीचींच तत्त्वें योग्य आहेत कीं हुकुमशाहीचीं ?**

**उत्तर**—सरकारच्या दृष्टीनें लोकशाहीची—अर्थात् हुकुमशाहीची !

**वि. शि. मेहेंदळे, पुणें.**

**प्रश्न—मार्मिक प्रश्न विचारून बिरबलाची मति गुंग करणारा बादशहाच बिरबलापेक्षां श्रेष्ठ नाहीं काय ?**

**उत्तर**—नाहीं. कारण त्याला फक्त प्रश्न विचारतां येत होते !—आणि शिवाय माझ्यापेक्षां तुम्हीं श्रेष्ठ ठराल !

• • •

---

[ पान ३८ वरून ]

"आहांत कां ? पाव्हणे आलेत..." अशी आरोळी कपाटावर आपटून नंतर आमच्या कानांवर आदळली.

"Speak of the devil..." असं वैतागानं म्हणून मी कपाळाला हात लावला.

आतां सरूचं इंग्रजी कच्चं आहे हें खरंच. पण डेव्हिल या शब्दाचा अर्थ तिला निश्चित माहित होता. तरीही सरूनं तिकडे अजिबात लक्ष दिलं नाहीं...

धांवतच ती दार उघडायला गेली आणि आपल्या भावाला म्हणाली, "आतांच हे तुझी आठवण काढीत होते. अगदीं शंभर वर्षे आयुष्य आहे हो तुला."

या स्वागतानंतर लाडावून जाऊन तो खलपुरुष विकट हंसला. आपल्या हातांतली बॅग आमच्या घरांत अगोदरच असलेल्या बॅगांच्या मनोऱ्यावर ठेवून त्यानें तो पुरा केला. मग चपलांचा ढीग, बॅगांची उतरंड यावरून त्यानें उड्या मारल्या. आमच्या नवागत स्टीलच्या कपाटाला वळसा घातला आणि वाटेंतल्या अनेक वस्तूंना चुकवून तो धाडकन् कॉटवर कोसळला. मीहि कॉटवरून उठलो आणि समोरच्या कोळशाच्या पोत्यावर विराजमान झालों.

आणि मग नव्या कपाटाचं गुणवर्णन करण्यांत ती इतकी गढून गेली कीं जेवण आणि झोप यांचं भानच तिला राहिलं नाहीं...

त्यादिवशीं रात्रीं मी कपाट, कॉट, कोळशाचें पोतें आणि बंब यांच्यामध्यें मोकळ्या राहिलेल्या फटींत वांकडातिकडा होऊन झोंपलो. रात्रीं मी स्वतःकडे स्वप्नांत पाहिलें तेव्हां माझ्या शरीराला 'ळ' या अक्षरासारखा छानदार बांक आला होता.

आम्हीं घेतलेलें स्टीलचें कपाट मोठ्याच पायगुणांचें ठरलें कारण तेव्हांपासून निरनिराळ्या वस्तूंनीं आमचें इवलेसें घर सारखें भरत चाललें आहे.

सध्यां माझी बायको आणि आमचें स्टीलचें कपाट हीं दोन्ही घरांत आणि मी बाहेरच्या गॅलरींत रहात असतो. नुकतीच मी रजा घेतली असून सरकारी स्पर्धेत मला पहिलें बक्षीस मिळाल्यानंतर लगेच घ्यावयाच्या वॉशिंग मशीन, शिवण्याचें यंत्र, वॉटर गीझर, पंखा या आणखी इतर वस्तू घेतल्यावर मला आणि बायकोला राहण्यासाठीं एखादी छोटीशी, स्वतंत्र जागा असावी म्हणून मी जारीनें शोध चालविला आहे.

• • •



देवकी ही रामन मेनन नांवाच्या एका निवृत्त सरकारी अधिकाऱ्याची मुलगी. देवकीला समाजकार्याची फार आवड होती. मद्रासच्या हिंदी प्रचाराच्या कामांत ती मोठ्या उत्साहानें लक्ष घाली. १९५१ च्या सप्टेंबर महिन्यांत ती एका दुकानांत फौन्टनपेन विकत घेण्यासाठीं गेली. त्या दुकानाचा मालक अलवांदर हा स्वभावानें अघळपघळ आणि गमत्या दिसला. त्यानें देवकीला तिचं नांव विचारलं, पत्ता घेतला आणि ओळख वाढवली. आपण खूप श्रीमंत असून अद्यापि अविवाहित आहोंत आणि आपलं तुझ्यावर निरतिशय प्रेम आहे असं अलवांदरनें देवकीला भासवलं. त्याचं मिठ्ठास बोलणं, आणि प्रेमाच्या भूलथापा देवकीला अक्षरशः खऱ्या वाटल्या. विचारी देवकी त्याच्या प्रेमांत सांपडली. देवकी आतां आपल्या पूर्ण कह्यात आली आहे असें पाहून ऑक्टोबर महिन्यांत अलवांदरनें तिला मद्रासच्या क्राऊन हॉटेलमध्यें नेलें आणि तिच्या कौमार्याचा भंग केला.

पण थोड्याच दिवसांत देवकीला कळून चुकलं की अलवांदर हा विवाहित असून चांगला चार मुलांचा बाप आहे. ही माहिती खरी आहे काय असं विचारतांच अलवांदरनें बिनदिक्कत तिला आपल्या बायकोचं नांवहि सांगितलं. त्याक्षणीं देवकीला कळलं कीं हा गृहस्थ बदमाष असून गरीब निष्पाप पोरींना फसवून त्यांना आपल्या नादी लावणं हा त्याचा धंदाच आहे. त्यामुळें देवकीनें त्याचा नाद अजिबात सोडला इतकंच नव्हे तर त्याच्याशीं बोलणंहि टाकलं.

१९५२ च्या मे महिन्यांत देवकीची प्रभाकर मेननशीं गांठ पडली. कुठल्यातरी संस्थेचे सभासद व्हा अशी विनंति करायला तो तिच्याकडे आला. प्रथमदर्शनीच प्रभाकर देवकीला आवडला आणि प्रभाकरला देवकी आवडली. थोड्याच दिवसांनीं त्यांनीं एकमेकांजवळ आपलं हृदय खुलं केलं—प्रीतीच्या आणाभाका झाल्या.

अनुक्रमणिका

रहस्यमय सत्यकथा

# दे व की—

**—चं द्र से न**

२०. सप्टेंबर १९५२ रोजीं इंडो-सिलोन एक्स्प्रेसमध्यें तिसऱ्या वर्गाच्या एका डब्यांत बाकाखालीं एका हिरव्या ट्रंकेतून भयंकर घाण येत आहे अशी उतारूंनीं तक्रार केली. पोलिसांनीं ती ट्रंक उघडली तर आंत एका माणसाचें प्रेत. त्यांत हातापायांचे तुकडे तुकडे केलेले, आंत मुंडक्याचा मात्र पत्ता नव्हता—

या भयंकर राक्षसी खुनाची कहाणी म्हणजे या दुर्दैवी देवकीचें चरित्र !—

ही गोष्ट देवकीच्या वडिलांना कळली. त्यांनीं लागलीच तुम्ही विवाहबद्ध व्हा असा प्रेमाचा सल्ला दिला. त्याप्रमाणें ५ जून १९५२ रोजीं देवकी प्रभाकराची पत्नी झाली. त्यावेळीं प्रभाकर मद्रासच्या प्रिमियर इन्शुअरन्स कंपनीमध्यें कारकून म्हणून नोकरीला होता. याच महिन्यांत कंपनीनें 'फ्रीडम' नांवाचें एक मासिक सुरू केलें. व या मासिकाचा जाहिरात मॅनेजर म्हणून १०० रु. पगारावर प्रभाकरची नेमणूक झाली. या नव्या नेमणुकीनें तर प्रभाकर खूष झाला. दोन महिने कसे भरकन निघून गेले.

पण दुर्दैव कसं आडवं येतं पहा ! 'फ्रीडम' साठीं जाहिराती मिळविण्याकरितां प्रभाकर फिरत एक दिवस नेमका अलवांदरकडेच गेला. आपण जाहिरात देऊं शकत नाहीं असं अलवांदरनें सांगितलं – आणि बोलतां बोलतां देवकीसारखी सुरेख पोरगी गांठल्याबद्दल प्रभाकरचं हंसत हंसत अभिनंदन केलें.

या अभिनंदनामुळें प्रभाकर चरकला. अलवांदरसारख्या चंगीभंगी माणसाला आपल्या बायकोची काय माहिती ? प्रभाकरच्या मनांत संशयाचं भूत थैमान घालूं लागलं. याचा नी आपल्या बायकोचा संबंध तर आलेला नसेलना ?..अजूनहि आपल्या बायकोचे याच्याशीं बरे वाईट संबंध तर नसतील ना ? तो तसाच रागाच्या तिरीमिरींत घरीं गेला. २५ ऑगस्ट १९५२ ची ती संध्याकाळ. घरीं जाईपर्यंत त्याला सहा वाजले. देवकी अजून घरीं आली नव्हती. ती बरोबर ७॥ वाजतां आली. "कुठं गेली होतीस इतका वेळ ? कुणाबरोबर भटकत होतीस ?" प्रभाकरानें प्रश्नांचा भडिमार केला. देवकी म्हणाली—"मी शिकवणी आटपून आल्यें."

तिच्या या उत्तरावर प्रभाकरचा विश्वास बसला नाहीं. आतां हिच्याकडून वदवून कसं घ्यायचं याचा त्याला ध्यासच लागला. त्यानें दुसराच विषय काढला. "लग्नापूर्वी आपला अनेक स्त्रियांशीं संबंध आला होता -- तुझाहि कोणा पुरुषांशीं आला होता काय ?" असा प्रश्न त्यानें विचारला. पण देवकी कशालाच कबूल होईना. दोन दिवस त्यानें देवकीचा पिच्छाच पुरवला. नवऱ्याच्या मनांत भलताच संशय आला आहे हें पाहून देवकीनें दोन्ही रात्री रडण्यांतच घालवल्या. २७ तारखेला प्रभाकर तिला म्हणाला आज आपण सिनेमाला जाऊया. त्यानें मिनर्वा थिएटरची रात्रींच्या शोची तिकीटं काढली. सिनेमाला जाण्यापूर्वी तो तिला म्हणाला, "माझा एक हिप्नॉटिस्ट मित्र आहे. त्याला मागचं पुढचं सर्व कांहीं कळतं. त्यानें मला सांगितलंय की तुझा लग्नापूर्वी खात्रीनें कुणातरी पुरुषाशीं संबंध आलाय." नवऱ्याचे हे शब्द ऐकतांच देवकी चमकली. तिच्या मनावरचा ताण असह्य झाला. प्रभाकर पुढें म्हणाला, "तूं मला खरं काय तें सांग. मी सारं कांहीं विसरून जाईन आणि तुला क्षमा करीन."

शेवटीं देवकीनं त्याला सारं कांहीं सांगण्याचा निर्धार केला. आणि सिनेमा चालू असतानांच ११ वाजतां तिनें कबूली दिली कीं, लग्नापूर्वी आपला अलवांदर नामक एका पुरुषाशीं संबंध आला होता.

देवकीच्या तोंडचे हे शब्द ऐकतांच प्रभाकर रागानें थरथर कापूं लागला. त्याला सिनेमागृहांत बसणंहि अशक्य झालं. रात्रीं दोघांची मोठी बोलाचाली झाली. प्रभाकर म्हणाला, "तूं उद्यां त्याला इथं आणलंच पाहिजे." देवकी म्हणाली—"मी आणीन"—दोघांच्या बोलाचालींतील हीं शेवटचीं वाक्यें घरगडी नारायणच्या कानीं पडली.

दुसरे दिवशीं प्रभाकर ऑफीसांत गेलाच नाहीं. त्यानें शेजाऱ्याकडून एक सुरी आणली. सकाळीं १० वाजतां देवकीनें नीटनेटका पोशाख केला आणि बाहेर पडली. जरा वेळानें प्रभाकरनें घरगड्याला चार आणे खर्चासाठीं दिले आणि सांगितलं कीं "आज तुला सुटी. रात्रीं ये परत !"

सकाळीं ११ वाजतां जेम अँड कोच्या कचेरीच्या व्हराड्यांत देवकी अलवांदरशीं बोलत असतांना अनेकांनीं पाहिली. जेम अँड कंपनीचा वेंकटारंगम नामक नोकर मद्रास कॉर्पोरेशनच्या निवडणुकीला उभा राहिला होता त्याला अलवांदरसारख्या घडपड्या माणसाची मदत हवी होती. त्यानें पाहिलं कीं देवकी दुपारीं ऑफिसांतून बाहेर पडली आणि तिच्या मागोमाग त्यानें अलवांदरला गांठलं आणि विचारलं, "एवढं काय काम काढलंदस दुपारीं ?—तुझी मला मदत पाहिजे हं निवडणुकींत." त्यावर अलवांदर म्हणाला, "जरूर—मी येतोंच तासाभरांत." त्यावर वेंकटारंगम हंसला आणि म्हणाला -- 'पण निश्चित ये हं—नाहीं तर राहशील." त्याला अवलांदरचीं असलीं लफडीं माहिती होतीच !

देवकी प्रथम घरी आली आणि प्रभाकरानें दरवाजा उघडला आणि त्यानंतर सव्वाबारा वाजतां एका ऑटोरिक्षांतून अलवांदर तिथं आला आणि त्यानें दरवाजावर थाप मारली. देवकीनें दरवाजा उघडला आणि त्याला आंत घेतलं आणि कडी लावली.

अलवांदर आंत आल्यावर प्रभाकर स्वैपाकघरांत लपून बसला. देवकीनें अलवांदरला खुर्ची



अनुक्रमणिका

दिली बसायला. अल्वांदर म्हणाला, "आज रात्रीं तुझा नवरा घरीं नसला तर मला निरोप पाठव—मी येईन झोंपायला"

त्याचं हे वाक्य पुरं होतं न होतं तोंच संतापून लालीलाल झालेला प्रभाकर स्वयंपाकघरांतून बाहेर आला आणि म्हणाला-"तूं माणूस आहेस कीं हैवान आहेस—ही एक विवाहित स्त्री आहे हें तुला ठाऊक नाहीं? बोल. खरं सांग लग्नापूर्वी तुझा नि तिचा संबंध आला होता कीं नाहीं?"

अल्वांदर म्हणाला-"आला होता ना! पण आतां तूं कां जळतोस?"

त्याचें हें उत्तर ऐकतांच प्रभाकर आणखीनच भडकला. त्याने संतापून अलवांदरवर शिव्यांची लाखोली वाहिली आणि रागाच्या भरांत अलवांदरचा खून केला. त्याच्या डोक्यावर प्रहार केला आणि छातीवर प्रहार केला—अल्वांदरचें प्रेत त्यानें फरफटत स्वैपाकघरांत आणलें आणि प्रथम त्याचं डोकें धडापासून कापून काढलें. त्यानंतर त्याचे हात पाय व्यवस्थितपणें तोडले. त्यानें त्याचं डोकं एका फडक्यांत गुंडाळलं नंतर त्यावर एका ब्राऊन पेपर गुंडाळला आणि एक चेंडूसारखं बंडल तयार केलं. मात्र त्यापूर्वी सुरीनें चेहरा अगदीं छिन्नविछिन्न करून टाकला. शरीराचे उरलेले तुकडे त्यानें एका हिरव्या ट्रंकेंत भरले. पण ट्रंक भरून बंद केल्यावर त्यांतून रक्त गळतंय असं देवकीच्या नजरेस आलं, तेव्हां तिनें आपली एक साडी दिली. त्या साडीनें तें रक्त पुसलं आणि त्याच साडीनें ते तुकडे गुंडाळून परत ट्रंकेंत व्यवस्थित भरले.

दुपारीं चार वाजतां प्रभाकरानें एक रिक्शा केली आणि रोयापुरम बीचवर गेला. तेथें त्यानें तें मुंडकं समुद्रांत टाकलं आणि पांच वाजतां तो घरीं आला. साडे पांच वाजतां नारायण घरीं आला आणि पाहतो तों देवकीबाई मोरींत कपडे धुतेय. त्यानें मी धुवायला मदत करूं का म्हणून विचारलं. त्यावर प्रभाकर त्याच्या अंगावर ओरडला आणि म्हणाला, "तूं आपलं काम बघ--तुला हांक मारल्याशिवाय मोरींत येऊं नकोस."

सहा वाजतां प्रभाकरनें एक रिक्शा आणली आणि त्यांत ती हिरवी ट्रंक ठेवली आणि तो इग्मोर स्टेशनवर गेला. तेथे त्यानें दोन प्लॅटफॉर्म तिकीटं घेतलीं आणि साडेसातच्या सुमारास त्यानें ती ट्रंक इंडो-सिलोन एक्स्प्रेसच्या एक थर्डक्लासच्या डब्यांत बांकाखालीं ठेवून दिली.

रात्रीं प्रभाकर परत बाहेर गेला आणि त्यानें सलूनमध्यें जाऊन आपल्या मिशा काढून टाकल्या. सकाळीं त्यानें शेजाऱ्याची सुरी परत केली आणि ९ वाजतां बाजारांत जाऊन १३ रुपयांची एक ट्रंक विकत घेतली. १० वाजतां दोघांनीं सामानाची बांधाबांध केली आणि सर्व सामान एका हातगाडीवर टाकलं आणि तें सासऱ्याच्या घरीं नेलं. दुपारीं ते बाजारांत गेले आणि कांहीं चिल्लर खरेदी केली, घरीं आले आणि घराला कुलूप लावून चावी घरमालकाकडे दिली आणि त्यांनीं मद्रास सोडलं.

पण पाप कधीं छपून राहातं? त्याला वाचा फुटतेच. २९ तारखेला ११-४५ वाजतां इंडो सिलोन एक्स्प्रेसच्या तिसऱ्या वर्गाच्या एका डब्यांतील उतारूनीं तिकीट चेकरजवळ तक्रार केली कीं आपल्या डब्यांत भयंकर घाण येतेय! तपासणी करतां बाकाखालीं एक हिरवी ट्रंक सांपडली. मानमदुराच्या स्टेशनमास्तरनीं धनुष्कोडीच्या पोलीस सबइन्स्पेक्टरच्यासमोर ती ट्रंक उघडली तर आंत कुजलेलं धड, हात पाय सर्व तोडून वेगळे केलेले आणि धडाला बांधलेले एका दोरीनें. छातीवर मार बसलेला. पोटांतहि खोल जखम. पायाचे मोजे तसेच होते.

१२ ऑक्टोबरला पोस्टमार्टेम आणि इतर तुकड्यांची आणि हाडांची केमिकल अनलायझरनें तपासणी केली.

इकडे २९-८-५२ ला जेम आणि कंपनीच्या एका भागीदारानें पोलिसांत तक्रार नोंदवली कीं अलवांदर नामक एक गृहस्थ कालपासून बेपत्ता आहे. या गृहस्थाचा जन्म १२ मे १९१० सालचा. शिक्षण—पदवी परीक्षा उत्तीर्ण आणि युद्धकाळांत सैन्यांत नोकरी केलेली आणि हल्ली फाऊंटनपेनचा धंदा. वृत्ती मात्र छंदी फंदी. पोरींची शिकार करण्याचं व्यसन.

पोलीस इन्स्पेक्टर रामनाथ अय्यर यानें तपासाला सुरवात केली त्याच्या हाती आलेल्या कांहीं माहितीच्या धाग्यावरून त्यानें १ सप्टेंबर १९५२ ला दुपारीं १॥ वाजतां रायपुरम् बीचवर कसून पाहाणी केली आणि ४। वाजतां एका हेडकॉन्स्टेबलला एका लाटेवर एक मुंडकं तरंगतांना दिसलं. त्या मुंडक्याची तपासणी प्रो. जेकब, प्रोफेसर ऑफ फोरेंनीक मेडिसीन यांच्या समोर डॉ. गोपाळ कृष्णन् यांनी केली. त्या मुंडक्याचा आकार, दातांची रचना, आणि ट्रंकेंतील सांपडलेलं धड यावरून तें एकाच व्यक्तीचें आहे हें सिद्ध झालें.

१०-९-५२ ला पोलिसांनीं प्रभाकर मेननला मुंबईत अटक केली. त्याच्याजवळ एक पेन आणि रिस्टवॉच सांपडलं. या दोन्ही वस्तु अलवांदरच्या होत्या हे मागाहून सिद्ध झालें. दुसऱ्या दिवशीं पोलिसांनीं देवकीला अटक केली आणि दोघांना मद्रासला आणलं. पोलिसांनीं मयताचा हातरुमाल आणि चड्डी (रक्तानें भरलेली) हजर केली. १९५३ मध्यें दोघांच्यावर खटला भरण्यांत आला. प्रभाकरला गुन्हा केल्याबद्दल आणि देवकीला गुन्ह्यास उद्युक्त करणें आणि मदत करणें असे आरोप ठेवले गेले. ज्यूरींनीं एकमतानें दोघांना दोषी ठरवलें आणि प्रभाकरला एकूण ८ वर्षांची सक्तमजुरी आणि देवकीला ४ वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा झाली.

प्रभाकरच्या सुडाची ही कहाणी संपली. आज या घटनेला सात वर्षें झालीं. अजूनहि प्रभाकर तुरुंगांत आहे. देवकी मात्र सुटली.

वरून दुबळीं दिसणारीं माणसं केव्हां केव्हां किती भयंकर राक्षसी कृत्यें करूं शकतात याचं उदाहरण म्हणजे देवकी प्रभाकरची गोष्ट.

* * *

दीपावलीच्या

**वर्गणीदारांस विनंति**

ज्यांना दिवाळी अंक. र. पो. नें हवा असेल त्यांनीं ५० न. पैसे पाठवून द्यावेत.

## लेखकांस सूचना

**दीपावलीसाठीं** अनाहूत साहित्य पाठवितांना लेखकांनीं पुरेसें पोस्टेज सोबत पाठवावें. सोबत पोस्टेज नसलेलें नापसंत साहित्य परत पाठविलें जाणार नाहीं.

“एक काळ्याभोर रंगाचें विमान सकाळीं अकराच्या सुमारास बरेंच खालीं येऊन आमच्या बोटीशीं समांतर जाऊं लागलें. आम्हां उतारूंत एकच खळबळ उडाली. इंडोचिनी कम्युनिस्टांच्या विमानानें एखादा बॉंब या ब्रिटिश जहाजावर सहज टाकला, तर जहाजासकट बुडून गेलेले आम्हीं लोक परत जिवंत होणार नव्हतों.........”




# गं ध द्वी प

## एक अद्भुतरम्य प्रदेश

—अनंत काणेकर

जोहोर-बारू रोडवर युनिव्हर्सिटीच्या आसपास प्राध्यापकांसाठीं छोटे छोटे सुंदर बंगले आहेत. डोंगराळ भागांतल्या वर खाली जाणाऱ्या रस्त्यावरील उंगकू अझीझ यांचा बंगला सांपडायला आम्हाला बराच वेळ लागला. ते आमची वाटच पहात होते. त्यानां पाहून मी चकित झालों. ते मलायी मुळींच दिसत नाहींत. तांबूस सोनेरी केस आणि दाढी असलेले, गोरे पान उंगकू पांढरा सदरा आणि पायजमा घातलेल्या एखाद्या युरोपियनासारखे दिसत होते. मलायी आपल्या गुरख्यांसारखे बारीक डोळ्यांचे आणि निमगोरे किंवा काळसर असतात. पस्तिशीच्या आसपास असलेले उंगकू अब्दुल अझीझ एखाद्या इंग्रजासारखे दिसत होते, आणि इंग्रजीही अतिशय सफाईदार बोलत होते. या गोष्टींचें अर्थात् आश्चर्य वाटावयाचें कांहींच कारण नाहीं, उंगकू ही उपाधि मलायाच्या राजघराण्यांतल्या पुरुषांनाच लावतात. मलायांतल्या नऊ राज्यांचे नऊ सुलतान आहेत. सिंगापुराला लागून असलेल्या जोहोर संस्थानाच्या सुलतानाच्या घराण्यांतील उंगकू अब्दुल अझीझ आहेत. त्यांचे वडील सुलतानांच्या दूरच्या चुलत भावांपैकीं. त्यांनीं युरोपियन स्त्रीशीं लग्न केलें. अझीझ युरोपियनांसारखे दिसतात याचें कारण त्यांची त्यांची आई युरोपियनच होती. त्यांचीहि पत्नीहि गोरेकांतीची, आणि झेबुन्निसा किंवा नूरजहान यांची इतिहासांत आपण वर्णनें वाचतो तशा प्रकारचें अक्षरशः लावण्य असलेली आहे. त्यांची आठदहा वर्षांची छोटी मुलगी अक्तर तर एखाद्या युरोपियन मुलीसारखीच दिसते. त्यांच्या पत्नीचे वडील तुर्कस्थानांतले. त्यांच्या सासूबाई त्यांच्या आत्या. एखाद्या वृद्ध बेगमेसारख्या त्या तिथें बसल्या होत्या. मलायी राजघराण्यांतल्या बायकांना बेगम म्हणतात कीं काय ठाऊक नाहीं, पण राजघराण्याशीं प्रत्यक्ष संबंध असलेल्या पुरुषाला ‘ टेंगकू ’ उपाधि आहे. चुलत चुलत दूरच्या नात्यांतले ‘ उंगकू ’ सरदार दरकदार ‘ इंचे ’ आणि कुणाही सद्गृहस्थाला मलायींत ‘ तुआन् ’ म्हणतात.

घरांतल्या मंडळीखेरीज अझीझ यांच्या एक सहकारी, विद्यापीठांतल्या राज्यशास्त्राच्या प्राध्यापक मिस् रोझेन्बर्ग याही तिथें लांबोळ्या बीअरग्लासमधून लिंबाचें सरबत पीत बसल्या होत्या. मलायाचे शिक्षणविषयक प्रश्न बरेचसे आमच्याइथल्या सारखेच आहेत. रोमन लिपींतून मलायी भाषा लिहावी कीं जुन्या अरबी लिपींतून लिहावी असा वाद चालू आहे. बरेचसे सुशिक्षित मलायी रोमन लिपीच्या बाजूचे आहेत; कारण इंग्रजी शिकलेले असल्यामुळें रोमनलिपी त्यांना जवळची वाटते. दुसरें असें कीं मलायांत अजून चांगलेसे लेखक किंवा वाङ्मय नाहीं. मलायाला अगदीं जवळचा म्हणजे नुकताच स्वतंत्र झालेला मलायी भाषाच बोलणारा इंडोनेशिया देश. इंडोनेशियानीं रोमन लिपि स्वीकारली आहे. इंडोनेशियाच्या कवी, कादंबरीकारांचीं पुस्तकें रोमन लिपींत प्रसिद्ध होतात. सुशिक्षित मलायी हींच पुस्तकें वाचतात. भारतापेक्षांहि मलाया मागासलेला असला आणि अजूनहि ब्रिटिश साम्राज्याच्या मगरमिठींतून सुटलेला नसला तरी मलायांतलें साक्षरतेचें प्रमाण मात्र भारतांतल्या पेक्षां खूपच मोठें आहे. मलायांतले चाळीस टक्के लोक साक्षर आहेत या साक्षरता प्रसाराचें उंगकू अझीझ यांनी सांगितलेलें कारण फार मजेदार आहे. ‘याचें कारण’ ते म्हणाले, ‘ कुराण आणि वृत्तपत्रें ! ’ ‘ तें कसें काय ? ’ म्हणून मीं विचारले, तेव्हां त्यांनी उत्तर दिलें कीं ‘ कुराण वाचतां आलें पाहिजे ’ म्हणून आणखीं कांहीं शिकायचें नसलें तरी अरबी लिपि शिकण्याचा पुष्कळ लोक प्रयत्न करतात. अर्थ समजो न समजो पण त्यामुळें कुराणाची पोपटपंची तरी त्यांना खास करतां येते. लिपि समजते त्यामुळें खेड्यापाड्यांतले लोकसुद्धां हातीं पडतील तीं मलायी वृत्तपत्रें वाचून काढतात. कांहीं दिवसांपूर्वीं खेड्यापाड्यांत फिरून मलायी शेतकऱ्यांच्या उत्पन्नाची नि कर्जबाजारीपणाची बरीचशी माहिती मी गोळा केली तेव्हां ही वस्तुस्थिति माझ्या ध्यानांत आली. हे आंकडे गोळा करीत असतां साक्षरतेसंबंधींहि मी प्रश्न विचारीत असे. ’

अझीझ यांचे वडील सुलतानाच्या कुळां-







अनुक्रमणिका

तर्हे, गर्भश्रीमंत असूनहि त्यांचा विद्याव्यासंग दांडगा होता. इसवी सनाच्या चौथ्या ते तेराव्या शतकापर्यंत जवळ जवळ हजार वर्षे भारतांतले पांड्य, पल्लवादि राजेच जावा, सुमात्रा, मलाया इत्यादि प्रदेशांवर राज्य करीत होते. नंतर अरबांच्या स्वाऱ्या होऊन हे देश मुसलमान झाले. त्यामुळें मलायी मुसलमान असूनहि मलायी भाषा आणि संस्कृति यांच्यावर संस्कृत भाषा आणि भारतीय संस्कृति यांची दाट छाया आहे. अझीझ यांच्या वडीलांचा संस्कृत भाषेचा अभ्यास इतका दांडगा होता कीं अझीझ म्हणाले, 'त्यानीं आपली दैनंदिनी संस्कृत भाषेंत ठेवली होती !'

हें सांगतां सांगतां अझीझ माडीवर गेले आणि वडीलांनी मुद्दाम संग्रह करून ठेवलेल्या कांहीं मूर्ती त्यानीं खालीं आणल्या. त्यांत संगमरवरी दगडाच्या पाशअंकुशधारी अशा उजव्या सोंडेच्या दोन सुंदर गणेशमूर्ती होत्या. या मूर्ती पेपरवेट म्हणून माझ्या टेबलावर मी वापरतो,' अझीझ म्हणाले. खांद्यावर पोपट असलेली मदुरेच्या मीनाक्षीचीहि एक पितळेची सुंदर मूर्ति होती. त्या संग्रहांत अष्टभुजा देवीची मूर्ति पाहून आम्हाला आश्चर्य वाटलें. अझीझ यांनीं हिंदुस्थानांत ज्याला बंदी केली आहे तें ऑब्रे मेनन यांचें 'रामायण रिटोल्ड' हें पुस्तक वाचलें होतें. त्यांना गीता वाचायची फार इच्छा होती. गीतेचें अगदीं अलिकडचें आणि अत्यंत सुंदर इंग्रजी भाषांतर वाचायचें असलें, तर सुप्रसिद्ध इंग्रजी लेखक आणि कवि खिस्तोफर इशरवुड याचें वाचा असें मी त्यांना सांगितलें.

'तुमच्या मलाया विद्यापीठांत तुम्ही संस्कृत विभाग उघडला पाहिजे,' चांदूरकर अझीझनां म्हणाले.

'तें खरं आहे' अझीझ म्हणाले, 'पण आमचें विद्यापीठ नवीनच आहे. तेव्हां आधीं इथं बोलल्या जाणाऱ्या मलायी, चिनी आणि तामीळ भाषांचे विभाग सुरू केले पाहिजेत. मलायीचा सुरू झालाच आहे.'

सिंगापुरांत तान्यांग नांवाचें विद्यापीठ निघावयाचें होतें आणि अमेरिकेंत स्थानिक झालेले प्रख्यात चिनी लेखक लिन् यू टांग हे त्या विद्यापीठाचे कुलगुरु म्हणून यायचे होते; पण सिंगापुरांत चिनीं विद्यार्थ्यांचा भरणा फार आहे आणि त्यांच्यांत कम्यूनिझमचें वारें जोरांत पसरलें आहे त्यामुळें लिन् यू टांग येत नाहींत, असें कुठें तरी मी वाचलें होतें, 'असं कांहीं म्हणतां येत नाहीं.' अझीझ म्हणाले, 'तान्यांग विद्यापीठाजवळ पैसा भरपूर आहे, तें सुरू व्हायला पाहिजे; पण अजून सुरू झालेलें नाहीं एवढें मात्र खरें.'

'तुम्हीं मक्केला जाऊन आलांत कीं नाहीं ?' असें चांदूरकरांनीं त्यांना विचारलें, तेव्हां ते हंसून म्हणाले, 'नाहीं बुवा ! मी अजून तरुण आहे—मला अजून पुष्कळ जीवन जगायचं आहे, मक्केला जाऊन आलं कीं कांहीं पाप करतां येत नाहीं म्हणे !'

मलायी लोक मुसलमान असूनहि पुष्कळ हिंदु चालीरीती ते पाळतात, असें सोनाळकर म्हणाले, त्यांवर अझीझ तावडतोब उत्तरले, 'याचं कारण मलायी लोकांनीं राजीखुषीनें हिंदु धर्म सोडून मुसलमानी धर्म स्वीकारला त्यांच्यावर तो कुणी लादला नाहीं.' त्यामुळें हिंदु धर्मांतलें जें कांहीं चांगलें आणि राखावेंसें वाटलें तें त्यांनीं राखून ठेवलें.'

रात्रीचे आठ वाजले तेव्हां आम्हीं जायला उठलों. त्यापूर्वी त्यांनीं खरवसासारखें कांहीं गोड आम्हांला खायला दिलें. "नुकताच आमचा 'हरिराया' किंवा सणाचा दिवस होता. तेव्हां 'पुआसा' असतो म्हणून हें गोड केलें होतें," ते म्हणाले. मलायी लोकांचा 'पुआसा' म्हणजे आमचा 'उपवास' तर नव्हे ?

त्यांचे आभार मानून आम्ही बाहेर पडलों.

कॅथे नांवाचे अकरा मजल्याचें एक टोलेजंग हॉटेल सिंगापुरांत आहे. तिथें एक सिनेमागृहहि आहे. आज रात्रीं एक सुंदर इंग्रजी चित्रपट तिथें सुरू होणार होता. रोटरी क्लबतर्फे सोनाळकरांनीं या चित्रपटाची तिकिटें घेतली होतीं. सोनाळकरांच्याच घरीं जेवण करून आम्ही चित्रपट पहायला गेलों. आजूबाजूला सर्व ब्रिटिश स्त्रीपुरुष दिसत होते. चित्रपट संपल्यावर अश्वारूढ एलिझाबेथ राणीचें चित्र पडद्यावर आलें आणि 'गॉड सेव्ह दि क्वीन' गाणें सुरू झालें तेव्हां प्रेक्षक खडे उभे राहिले. भारत स्वतंत्र होऊन सात आठ वर्षे झाल्यामुळें हें सर्व मी विसरलों होतों. मला कसेसेंच वाटलें. सिंगापूर अजूनहि ब्रिटिश साम्राज्यांत असल्याची मला एकदम आठवण झाली.

मुख्य चित्रपट सुरू होण्यापूर्वी छोटे वृत्तपट दाखविण्यांत आले. त्यांत सिंगापुरांत नुकत्याच झालेल्या आंतरराष्ट्रीय बॅडमिन्टन सामन्यांचीं कांहीं दृश्यें होतीं. अमेरिका विरुद्ध भारत सामन्यांत भारताला नंदू नाटेकर, डोंगरे वगैरे आमच्या खेळाडूंनीं विजय मिळवून दिला. तें दृश्य आल्याबरोबर चांदूरकरांनीं आणि मी जोरानें टाळ्या पिटल्या. संबंध थिएटरांत आमच्याखेरीज कुणीहि हाताला हात लावला नव्हता. आमच्याच टाळ्यांचा आवाज आम्ही ऐकला, आणि आम्ही एकदम थांबलों. आमच्या शेजारीं बसलेली एक गलेलठ्ठ ब्रिटिश म्हातारी कपाळाला आंठ्या घालून आमच्याकडे रोखून पहात असलेली मला दिसली !

रात्रीं १२ ला बोटीवर परतलों.

**२६ मे १९५५**

आज दुपारीं साडेबारा वाजतां बोट सिंगापूर सोडणार. चार दिवसांनी हॉंगकॉंग. सकाळीं साडे आठ वाजतां चहापाणी झाल्यावर बाहेर पडलों. रस्त्यांत फिरून अकरा साडे अकराला बोटीवर परतण्याचा विचार केला. चांदूरकर म्हणाले, 'सिंगापूरचें रेल्वे स्टेशन तरी पाहूं या कसें काय आहे तें.' स्टेशन फारच भव्य आहे. प्रवेश द्वाराशीं चार प्रचंड स्तंभ आहेत. त्यांच्यावर कृषि, व्यापार, वहातूक आणि उद्योग अशा नांवाच्या चार आकृति कोरलेल्या आहेत. आंत गेल्यावर मात्र आश्चर्याचा धक्का बसला. सिंगापूर हें मुंबईएवढें नसलें तरी मुंबईसारखें एक मोठें शहर, पण या भव्य स्टेशनांत अक्षरशः शुकशुकाट होता. दोन चार ब्रिटिश सैनिक दूर एका कोपऱ्यांत उभे असलेले दिसले. इतरत्र हमाल, उतारू कुणी नाहीं. कसलीच गडबड कुठें दिसली नाहीं. सकाळीं एक आणि संध्याकाळीं एक अशा फक्त दोन गाड्या इथून मलायांत कुआला लंपूर, पिनांग वगैरे ठिकाणी जायला सुटतात म्हणे. आम्ही येण्यापूर्वी सकाळची गाडी सुटून गेली असावी.

स्टेशनांतला 'सेंट्रल हॉल' भव्य, प्रशस्त आणि सुशोभित आहे. भिंतींच्या वरच्या बाजूला चहूंकडे मोठमोठीं प्रचंड चित्रें

रंगविलीं आहेत. मलायी जनतेच्या जीवनांतलीं दृश्यें त्यांच्यांत आहेत! कुठें शेत नांगरीत असलेले मलायी शेतकरी दिसतात. तर कुठें जस्ताच्या खाणींत काम करणारे खाण–कामगार दिसतात. स्टेशनांतलें पुस्तक-केंद्रहि भलें मोठें आहे. चौकशीच्या खिडकीकडे एक तामील कारकून बसला होता. त्याच्याशीं थोडावेळ गप्पा केल्या. "हाँगकाँगहून परततांना पुन्हां सिंगापुरांत दोन अडीच दिवस आम्ही थांबणार, आणि मग पिनांगला जाणार; तेव्हां सिंगापुराहून आगगाडीनें कुआला लंपूरला—म्हणजे मलायांतल्या मुख्य शहराला जाऊन तिथून पिनांगला एक दिवस थांबणारी आमची बोट पकडतां येईल काय?" म्हणून आम्ही त्याला विचारलें.

"शक्य आहे" तो म्हणाला, "शेवटच्या दिवशीं सकाळीं इथून सव्वा आठला निघणाऱ्या गाडीनें तुम्ही निघा. संध्याकाळीं ६ ला कआला लंपूरला पोहोंचाल. तिथें फिरायला दोन अडीच तास तुम्हांला मिळतील लगेच साडेआठच्या गाडीनें निघून दुसऱ्या दिवशीं सकाळीं पिनांगला पोहोचूं शकाल. तीसपस्तीस मलायी डॉलर्स म्हणजे ४५–५० रुपये दुसऱ्या वर्गाच्या तिकिटांचे पडतील."

एक दिवसभर आगगाडींतून मलायाचा प्रदेश पहातां येऊन आणि दोन अडीच तास कुआला लंपूरमध्यें घालवतां येतील. पण गाड्या वेळेवर पोहोंचल्या नाहींत.' किंवा चुकल्या तर पिनांगहून बोट निघून जायची, आणि चांगलीच फजिती व्हायची तेव्हां हा विचार आला तसाच आम्हीं सोडून दिला.

साडेअकराला बोटीवर परत आलों. बंदरांत शिरतांना एका गटाराच्या काठाशीं पांचसहा फाटक्या कपड्यांतले चिनी कामगार एक फलक हातांत धरून स्वस्थ बसलेले दिसले. सिंगापूर हार्बर बोर्डाचे संपावर गेलेले ते नोकर होते. फलकावर कामगाराचा विळा मालकाला तोडून टाकतो आहे, असें चित्र होतें!

सिंगापुरांत बोटीवर चढलेल्या नव्या चिनी आणि युरोपियन उतारूंची, आणि त्यांना पोहोचवायला आलेल्या लोकांची एकच गर्दी उडाली होती. बरोबर साडेबारा वाजतां बोटीनें धक्का सोडला.

एक वाजतां जेवणघरांत गेलों. तो आमच्या टेबलावर दोन नवे सोबती आलेले दिसले. एक प्रतापसिंग नांवाचा उंच, धिप्पाड शीख होता, आणि दुसरा त्याचा मित्र २५–३० वर्षांचा चिनी 'तरुण रॉबर्ट्स्'. दोघेहि सुट्टी मजेंत घालविण्याकरतां हाँगकाँगला चालले होते. दोघेहि उत्तम इंग्रजी बोलत होते. 'माझे आईवडील साठ वर्षांपूर्वी मलायांत येऊन के. एल. मध्यें स्थायिक झाले', प्रतापसिंग म्हणाला. के. एल. म्हणजे कु आला लंपूर मलायांत एवढें मोठं नांव उच्चारण्याऐवजीं बरेच लोक के. एल. म्हणतात. प्रतापसिंग रबर तज्ज्ञ आहे. 'मळेवाल्यांना रबराच्या लागवडीबाबत सल्ला देण्याकरतां मला मलायांतल्या खेड्यापाड्यांत जंगल पहाडांत खूप फिरावें लागतें,' तो म्हणाला.

'महायुद्ध थांबल्यापासून गेलीं कित्येक वर्षे मलायांतले कम्यूनिस्ट जंगलांत राहून ब्रिटिशांविरुद्ध गनिमी युद्ध चालवीत असल्याचें आम्ही वृत्तपत्रांतून वाचतों. मधून मधून ब्रिटिश मळेवाल्यांना ठार केल्याच्याहि बातम्या येतात. केवढें तरी मोठें ब्रिटिश सैन्य वर्षानुवर्षे जंगलांतल्या कम्यूनिस्टांचा बीमोड करण्यांत गुंतलें आहे. तुमची जंगलांत फिरतांना कधीं कम्युनिस्ट लढवय्याशीं गांठ पडली काय?' म्हणून मी त्याला विचारलें. 'इतक्या वर्षांत एकदांहि नाहीं,' तो म्हणाला, 'ब्रिटिश मळेवाल्यांना आणि जमीनमालकांना ते मारतात एवढं मात्र खरं!'

## २७ मे १९५५

इंग्लंडमध्यें चालू असलेल्या सार्वत्रिक निवडणुकीचे निकाल आज सकाळीं ११, संध्याकाळीं ५, ७ आणि नऊ वाजतां बोटीच्या रेडिओवरून ध्वनिक्षेपित होणार आहेत. त्यामुळें इंग्लिश उतारूमध्यें मोठी खळबळ माजून राहिली आहे. हाँगकाँग इंग्रजांची वसाहत आहे आणि तिथें जाणारे बहुतेक उतारू व्यापारी आहेत; त्यामुळें हुजूर पक्षच बहुमतानें पुन्हां निवडून यावा अशी बहुतेकांची तीव्र इच्छा आहे. दुपारीं डेकवर बसून रेडिओवरून येणाऱ्या बातम्या मी ऐकत होतों. कॉन्झर्व्हेटिव्हांची सरशी होत असल्याच्या बातम्या होत्या. इंग्रज सहप्रवासी खुषींत दिसत होते. माझ्या शेजारच्या खुर्चीवर सिंगापुरांत बोटीवर असलेला एक चिमुकला चिनी गृहस्थ बसला होता. त्याच्या ओळखीचा जॉर्ज नांवाचा एक इंग्रज डेकच्या टोकाशीं बीअर घेत उभा होता. माझ्याकडे वळून जॉर्जकडे पहात तो चिनी गृहस्थ म्हणाला, 'पाहलंत जॉर्ज कसा खुषींत आहे तो! व्यापारी बच्चा आहे. मजूरपक्षानं राज्य इंग्लडांत झालं तर आपल्या वसाहती ते सोडून देतील—मग व्यापार करून जॉर्ज नबर कुठं होणार?'

या चिन्याचें नांव मि. विप्. त्यानें उच्चार विप्' केला; पण कागदावर लिहून देतांना, 'वाय ए पी' 'याप्' असें लिहिलें! याप् ही एक खरोखरच 'अविस्मरणीय व्यक्ति' आहे. त्याचें तें खांदे उडवून स्वतःशींच हसणें, मध्येंच आकाशाकडे डोळे लावून मिस्किलपणें कांहीं तरी उद्गारणें, चांगलें इंग्रजी, पण 'र' चा 'ल' करीत, कांहीं व्यंजनें गाळीत तुरुतुरु बोलणें.—सर्वच कांहीं मजेदार होतें. माणूस बहुश्रुत, हुषार, विनोदी; पण आपण निश्चितपणें कोणत्या मताचे आहोंत याची दाद लागूं न देणारा धूर्त वाटला. भांडवलशाही, समाजवाद, डावे राजकारण यांचा त्याचा चांगला अभ्यास दिसला. इतिहास, तत्त्वज्ञान, भारतीय राजकारण यांचीहि त्याला चांगली माहिती होती. 'चिन्यांचें मूळ वसतिस्थान तिबेट' तो म्हणाला, "तुमच्या हिंदुस्थानांत आपण १९६५ सालीं येणार. बुद्ध गया आणि सारनाथ पाहण्याची मला फार इच्छा आहे. तोंपर्यंत तुमची भाषा शिकणार. एखाद्या देशाची भाषा आल्याशिवाय त्या देशांत फिरण्यांत कांहीं अर्थ नाहीं.'

'तुमच्या बोलण्यावरून तुम्हांला आमच्या देशाची बरीच माहिती दिसते.' मी म्हणालों.

'आहे थोडीशी' आपले इवलेसे डोळे मिचकावीत तो म्हणाला, 'तुम्हां हिंदु लोकांना आठ मुलगे पाहिजे असतात ना!— आम्हा चिन्यांना सात हवे असतात!'

[ अपूर्ण ]















## साहित्य

### शिवचरित्राची आवश्यकता

मुंबई सरकारचे मुख्य मंत्री श्री. यशवंतराव चव्हाण यांनीं सुप्रसिद्ध इतिहाससंशोधक महामहोपाध्याय दत्तो वामन पोतदार यांना शिवचरित्र लिहिण्याची विनंती केली आणि अखेर त्यांनीं ती मान्य केली असें वृत्त गेल्या महिन्यांत प्रसिद्ध झालें आहे. या वृत्ताबाबत अधिकृत असें सरकारी पत्रक निघालें नसलें तरी या बातमींत बराचसा तथ्यांश आहे यांत वाद नाहीं. मराठींत फुटकळ अशी अनेक शिवचरित्रें उपलब्ध असली तरी साधार आणि अधिकृत असें विस्तृत शिवचरित्र अजून लिहिलें गेलेलें नाहीं. शिवाजी राजांचें चरित्र म्हणजे ३०० वर्षांपूर्वीच्या महाराष्ट्राच्या स्वातंत्र्याच्या चळवळीचा रोमहर्षक इतिहास. शिवाय त्यांत कालच्या महाराष्ट्राच्या सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाचेंहि प्रतिबिंब पडलें पाहिजे आणि म्हणून असें अवघड कार्य एकट्या दुकट्या व्यक्तीच्या हातून होणें कठीण आहे. वास्तविक पाहातां या कार्यासाठीं सरकारनें अनेकांना एकत्र गोळा केलें पाहिजे. सरकारी योजनेशिवाय, आणखी एका संस्थेतर्फे शिवचरित्राचें कार्य सुरू करण्यांत आल्याचेंहि प्रसिद्ध झालें होतें. ती संस्था म्हणजे मुंबईची मराठामंदिर संस्था. या संस्थेतर्फे प्रा. शेजवलकर यांना शिवचरित्रलेखनाची विनंती करण्यांत आली आणि त्यांनी ती मान्य केली असेंहि मध्यंतरी प्रसिद्ध झालें होते. वास्तविक पाहातां अशा एकांड्या योजना आतां मागें पडल्या पाहिजेत आणि सरकारनें संघटितपणें एक शिवचरित्र ग्रंथप्रकाशन समिती श्री. यशवंतराव चव्हाणांच्या अध्यक्षतेखालीं स्थापन करून शिस्तशीर स्वरूपांत हें प्रचंड कार्य सुरू केलें पाहिजे. नाहींतर एकट्या दुकट्या माणसाच्या हातून होणारें कार्य कितीहि उत्तम स्वरूपाचें असलें तरी वर्ण्यविषयाची व्यापकता आणि महानता लक्षांत घेता अखेरीस तोकडेंच ठरणार आहे.

— पिनाकी




### चीनची शिरजोरी

भारतीय राजकारणांत नित्य नव्या समस्या निर्माण होत आहेत. विशेषतः भारतीय सरहद्दीवरील परिस्थिती विशेष नाजूक झाली आहे. इतके दिवस पाकिस्तानच्या कटकटी चालू होत्या आणि आतां त्यांत चीनची भर पडली आहे. १० सप्टेंबरला पंतप्रधान पं. नेहरूंनीं राज्यसभेंत या विषयावरील चर्चेत भाग घेतांना जो खुलासा केला तो या दृष्टीनें चीनच्या परराष्ट्रीय धोरणावर प्रकाश पाडणारा ठरला. १९५६ सालीं चौ एन् लाय भारतांत आले होते तेव्हां त्यानीं भारत चीनचे जुने मैत्रीचे संबंध लक्षांत घेतां सरहद्दीबाबत मॅकमॅहन रेषा मान्य केली. आणि या मान्यतेचा अनेक वेळां पुनरुच्चार केला. असें असतां आज मॅकमॅहन रेषा ही ब्रिटिश साम्राज्यशाहीची निर्मिती असल्याचें जाहीर करून उलट भारतीयांनींच आमच्यावर खुष्कीच्या मार्गानें आणि समुद्रमार्गें आक्रमण केल्याचा दावा मांडला. विशेषतः चीन भारतची मैत्री आणि चीनला युनोमध्यें स्थान देण्याबाबत भारतानें केलेली खटपट हें लक्षांत घेतां चीननें आपली मैत्री कवडी किंमतीची मानली यामुळें पं. नेहरूंच्या अंतःकरणाला फार यातना झाल्या. यामुळें राज्यसभेंत कोणावरहि अतिक्रमण न करतां सरहद्दीचें रक्षण करण्याचा आपला निर्धार त्यांनीं निसंदिग्धपणें प्रकट केला. या प्रकरणांत मात्र आपण पार्लमेन्टला विश्वासांत घेतलें नाहीं. ही चूक झाली अशी त्यांनीं कबूली दिली.

चीनच्या प्रकरणामुळें भारतांत सर्वत्र अस्वस्थ वातावरण निर्माण झालें ही गोष्ट साहजिकच त्याचे प्रतिध्वनि पार्लमेंटमध्येंहि उमटले. कम्युनिस्ट सोडून सर्व पक्षाच्या सभासदांनीं राज्यसभेंतील चर्चेंत मोठ्या हिरीरीनें भाग घेतला. उपाध्यक्ष राधाकृष्णन् यांनीहि आपला नेहमींचा शिरस्ता सोडून प्रस्तुत चर्चेची बाब अत्यंत नाजूक असल्यामुळें संतापी भाषणांचा उपयोग नाहीं अशी सूचना दिली.

चीन हा भारताचा अगदीं निकट शेजारी. त्यामुळें या दोघांच्या संघर्षाची परिणती काय होते याकडे सर्व जगाचें लक्ष लागलें आहे. अमेरिकन वृत्तपत्रांनीं तर या घटनेला ढळढळीत



अनुक्रमणिका





प्रसिद्धी दिली आणि त्यामुळें शांततामय तटस्थ असे परराष्ट्रीय धोरण राखणाऱ्या पंडित नेहरूंच्या मुत्सद्देगिरीची ही कसोटीच आहे.

## लाओसची गुंतागुंत

आशियांतील या चिमुकल्या डोंगराळ वसाहतीचा प्रश्न पुनरपि बिकट आणि गुंतागुंतीचा झाला आहे. चीन, थायलंड यांच्या सरहद्दीवरील या वसाहतीला नेहमींच बिकट समस्यांना तोंड द्यावें लागलें. फ्रेंचांच्या राजवटींत तेथें ते आगगाडीचीहि सोय करूं शकले नाहींत. आज लाओसच्या कटकटींत अमेरिकेसारख्या शक्तिमान राष्ट्रानें मन घातलें असून गेल्या महिन्यांत अमेरिकन सरकारच्या लष्करी खात्यांची एक बैठक भरून त्यांनीं चिनी आणि उत्तर व्हिएतनामी बंडखोरांच्या वाढत्या आक्रमणापासून लाओसचें रक्षण करण्याचा विडाच उचलला असून लाओसच्या सैन्याची संख्या २५००० हून ३०००० वर नेण्याचा संकल्प त्यानीं जाहीर केला. आणि त्याप्रमाणें अमेरिकन शस्त्रास्त्रे, आणि डोंगराळ भागांतील लढाईला उपयुक्त अशीं हेलीकॉप्टरसारखीं साधनें लाओसमध्यें पाठविण्याचा धडाका सुरू झाला आहे.

अर्थात् कम्युनिस्ट आक्रमणाबाबत सर्वत्र एकवाक्यता नाहीं. फ्रेंच अधिकाऱ्यांनीं या बाबतींत सबळ पुरावा नाहीं असें घोषित केलें आहे. लाओसच्या राजधानींत म्हणजे व्हिएंटिआन येथें अमेरिकन आणि फ्रेंच सरकारतर्फे लाओशियन सैन्याला अधिक शिक्षण देण्याची मोहीम सुरू करण्यांत येणार आहे या घोषणेवर अमेरिकेंतहि बरीच टीका झाली. गेल्या एका वर्षातच लाओसला अमेरिकेहून संरक्षणासाठीं २३७ लक्ष डॉलर्सची मदत झालेली आहे. याशिवाय ७० लक्ष डॉलर्सचीं शस्त्रास्त्रें पुरविण्यांत आलीं.

याशिवाय आतां अमेरिका लाओसच्या परिस्थितीची पाहाणी करण्यासाठीं युनो निरीक्षक पाठवूं इच्छिते. एकूण लाओस म्हणजे आशियांतील एक नवी राजकीय समस्या झाली आहे.

## अटळ विभाजन

१ नोव्हेंबर १९५६ रोजीं जन्माला आलेल्या द्वैभाषिक मुंबई राज्याचें विभाजन आतां अपरिहार्य आहे. गेला महिनाभर या विषयासंबंधीं वृत्तपत्रांनीं खूपच लिहिलें आणि अनेक तर्कवितर्क प्रसृत केले. शेवटीं विधानसभेंतील कॉंग्रेस पक्षाच्या सभेंत श्री. यशवंतराव चव्हाणांनीं प्रचलित बातमींत तथ्य असल्याचा खुलासा केला. अर्थात् हें विभाजन अटळ असलें तरी याच्या मार्गांत अजून अनेक अडचणी आहेत. याचें मुख्य कारण म्हणजे मुंबईकर, गुजराथी मंडळी या विभाजनाच्या कल्पनेमुळें फारशी आनंदित झालेली नाहीं. शिवाय सीमा प्रश्न आणि विदर्भाची कुरकुर आहेच. विदर्भाशिवाय संयुक्त महाराष्ट्रांत कॉंग्रेसला बहुमत नसल्यामुळें अणेविधार्णीनी कितीहि आरडा ओरडा केला आणि निदर्शनें केलीं तरी कॉंग्रेस हायकमांड या मागणीला फारशी भीक घालतील असें वाटत नाहीं. दुसरा महत्त्वाचा प्रश्न म्हणजे बेळगांव कारवारचा. पुढच्या निवडणुकींत कॉंग्रेसला यश मिळवून देण्यासाठीं त्यांना 'पाटसकर योजना' अंमलांत आणून बेळगांव महाराष्ट्रांत सामील करावें लागेल. मात्र या गडबडींत महाराष्ट्रानें मुंबईवर आपला हक्क शाबीत केला असला तरी त्यामुळें आणि त्यासाठीं डांग, नवापूर आणि उंबरगांव यांचे दान गुजराथला करावें लागणार हें निश्चित. गेलीं दोन वर्षें डांगमध्यें जें पद्धतशीर गुजराथीकरण चालू आहे त्याचा हा अपरिहार्य असा परिणाम आहे.

आगामी संयुक्त महाराष्ट्राच्या राजकारणांत 'समिती'चें भवितव्य काय? असा प्रश्न आहेच. समितींतील एक प्रबळ पक्ष म्हणजे प्रजासमाजवादी, यांचें नि कम्युनिस्टांचे मूळपासून हाडवैर. अर्थात त्या हाडवैरामुळें समितीच्या राजकारणाची म्युनिसिपालिटी झाली. आतां संयुक्त महाराष्ट्र येतांच प्रजासमाजवादी पक्ष समितीचें विसर्जन करा अशा गोष्टी बोलूं लागला आहे. कदाचित् पुढील कांहीं महिन्यांतच प्रजासमाजवादी पक्षाला आपलें धोरण ठरवावें लागेल. अर्थात् केरळच्या राजकारणाची प्रतिक्रिया महाराष्ट्रांत घडणार असेल तर प्र. समाजवादी पक्ष कॉंग्रेसशीं मिळतं घेऊन मंत्रिपदावर आरूढ होण्याचा अधिक संभव दिसतो. पण आगामी मंत्रीमंडळांत प्रजासमाजवादीपक्ष किती जागा मागेल आणि त्यांचा हा ऐतोबासारखा हट्ट कॉंग्रेस पुढारी कितपत पुरवतील तेंच आतां पाहायचें.

संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नाप्रमाणें गुजरातसमोरहि अनेक बिकट समस्या आहेत. त्यांतील पहिली म्हणजे त्यांना सर्वच बिन्हाड नव्यानें मांडावयाचें आहे. त्यामुळें पहिला प्रश्न आहे राजधानीचा. त्यासाठीं एकूण तीन शहरांचीं नांवें पुढें घेतलीं जातात. राजकोट, बडोदें आणि अहमदाबाद. (कांडला हेंही असावें अशी एक सूचना) त्यांतील अहमदाबादची सूचना अहमदाबादकरांनाच नामंजूर आहे. आतां राहातां राहिलें राजकोट आणि बडोदे. खरी स्पर्धा या दोन शहरांतच आहे. कदाचित् बडोदें हें मुंबईकर गुजराती मंडळींना राजकोटपेक्षां अधिक प्रिय आणि मुंबईपासून अधिक जवळ, तर सौराष्ट्र आणि कच्छच्या मंडळींना राजकोट प्रिय. त्यामुळें गुजराथची राजधानी आणि मुख्यमंत्रि हे दोन बिकट प्रश्न एकाच वेळीं सुटतील. मुख्यमंत्र्याच्या नांवासाठींहि अशाच प्रादेशिक व्यक्तींचीं नांवे घेतली जातात. मुंबईकर मंडळीना के. के. शहांनीं हें पद द्यावें अशी इच्छा तर बडोदेकर मंडळींना ज्येष्ठ मन्त्री श्री. जिवराज मेहता हेच या कामाला सर्वतोपरी लायक असें खात्रीनें वाटतें. सौराष्ट्राच्या मंडळींना हीं दोन्ही नांवें पसंत नाहींत. त्यांना वाटतें बलवंतराय मेहता अगर रसिकलाल पारीख यांच्यापैकीं कोणीतरी हीं जोखीम अंगावर घ्यावी तर अहमदाबादच्या व्यापाऱ्यांना श्रीमान खंडुभाई देसाई यांची वर्णी लावायची इच्छा आहे.

या प्रकरणांत मुंबई प्रदेश कॉंग्रेसचे विभागीय अध्यक्ष श्री. के. के. शहा यांची प्रतिक्रिया पाहाण्यासारखी आहे. श्री. शहा हे या विभाजनावर मुळींच खुश नाहींत. त्यांना मुंबई सोडावयाची इच्छा नाहीं. (मात्र त्यांचे कर्ते करविते श्री. स. का. पाटील यांचा संयुक्त महाराष्ट्राला आतां पाठिंबा आहे ही गोष्ट मोठी सूचक). त्यांच्या मतें मुंबईंत सार्वमत घेतलें तर ५७ टक्के मतदान संयुक्तमहाराष्ट्राच्या विरुद्ध जाईल. पण कॉंग्रेसश्रेष्ठींनीं हा निर्णय प्रजासमाजवाद्यांना कॉंग्रेसमध्यें सामील करून घेण्यासाठीं आणि गुजरातमधील स्वतंत्र पार्टीचें वाढतें बल थोपविण्यासाठीं घेतला असावा असें त्यांचें मत आहे.

तें कांहीहि असो आतां विभाजन अटळ आहे हें निश्चित! कारण आतां गोष्टी एवढ्या थराला आल्या आहेत कीं कॉंग्रेसनें जर कां मागें पाय घेतला तर महाराष्ट्रांत काय होईल तें सांगवत नाहीं.

—विष्णु शर्मा







अनुक्रमणिका

## सत्यं, शिवं, सुंदरम्

### हिंदी चित्रकलेची परागति

बॉम्बे आर्ट सोसायटीचें या वर्षीचें प्रतिमाचित्राचें खास प्रदर्शन अनेक पोरकट कारणांमुळें चांगलेंच स्मरणांत राहील. उद्घाटक महापौरांचें भाषण, प्रदर्शनांतली अस्ताव्यस्त मांडणी, त्यांतली दर्जाहीन चित्रकला आणि बक्षिसांचें वाटप. अशा या अनेक विक्षिप्त गुणांमुळें प्रदर्शन स्मरणांत राहावें ! 'फार फार तर पांच ते दहा रुपये चित्रांची किंमत घेऊन चित्रकला अगदीं खालच्या वर्गापर्यंत पोंचवली पाहिजे, असा महापौर यांच्या उपदेशपर भाषणाचा गोषवारा. खालच्या वर्गापर्यंत आतां काय काय पोंचायचें बाकी राहिलें, परमेश्वराला ठाऊक ! ज्या हेतूने बॉम्बे आर्ट सोसायटीनें या खास प्रदर्शनाची सुरुवात केली, तो हेतू मात्र साफ बारगळलेला आहे. आणि नेहमींच्याच वार्षिक प्रदर्शनाची दुसरी आवृत्ति आपण पाहात असल्याचा प्रदर्शन पाहाणाऱ्याला प्रत्यय येतो. पहिली एक दोन वर्षें कांहींतरी दर्जाला साजेसें राखले गेलें, परंतु नंतरचीं हीं दोन वर्षें म्हणजे शुद्ध पोरकटपणा ! मधल्या पिढींतील श्री. माधव सातवळेकर, बाबुराव साडवेलकर, मेस्त्री अशा लोकानीं वास्तविक या पोरकट भाऊगर्दींत आपलीं चित्रें ठेऊं नयेत. विसंगतीचा आणखी एक कळस म्हणजे कै. आगासकरांचें या प्रदर्शनांत ठेवलेलें एक सुंदर चित्र. मात्र तें चित्र पाहून तिथल्या अनागोंदी कारभारानें प्रक्षुब्ध झालेल्या मनाला थोडी शांति लाभली. आगासकरांच्या आत्म्याला मात्र कुठल्या अडगळींत आपली ही कलाकृति आणून टाकली आहे, असेंच वाटत असावें. या वर्षीचें सुवर्णपदक श्री. यशवंत माळी यांना, रौप्यपदक कुमारी प्रफुल्ला जोशी यांना आणि ताम्रपदक रमण पटेल यांना अशी वांटणी झाली. रमण पटेल यांचें शील्प या वाळवंटांत त्यांतल्या त्यांत थंडाइ देणारें वाटलें. बक्षिसांच्या वांटणीबाबतचा प्रश्न वादाळ आहे. अर्थातच परीक्षक मंडळाचा निर्णय अखेरचा मानणें हें आमचें कर्तव्य. हिंदी चित्रकलेची परागति होत चालली आहे ती पाहुन मन हळवें होतें, एवढेंच !

### एक स्तुत्य उपक्रम

पं. विष्णु दिगंबरांची पुण्यतिथी गेल्या महिन्यांत 'गांधर्व महाविद्यालयाच्या' सर्व शाखानीं साजरी केली. दादर येथील 'व्यास संगीत विद्यालया'तर्फे या निमित्तानें एक अभिनव असा कार्यक्रम सादर केला जातो. या वर्षी या संस्थेनें "संगीतांतील कांहीं घराणीं; त्यांची गायकी आणि इतिहास" या विषयावर एक परिसंवाद घडवून आणला होता. किराणा घराण्याचे यशवंतराव पुरोहित, जयपूर घराण्याचे वामनराव सडोलीकर, ग्वाल्हेर घराण्याचे श्री. आरोलकर आणि आग्रा घराण्याचे स्वामी वल्लभदास, यानीं या परिसंवादांत भाग घेतला होता. परिसंवादाचा हा कार्यक्रम छान वाटला, व वरचेवर असे कार्यक्रम झाले पाहिजेत अशी तीव्र इच्छा श्रोत्यानीं प्रगट केली. विष्णु दिगंबर पलुस्करांचे एक शिष्य श्री. बी. आर. देवधर हे 'आवाज साधना' या विषयाच्या विशेष अभ्यास करण्यासाठीं पुढच्याच आठवड्यांत अमेरिकेला जात आहेत. 'संगीत नाटक ॲकॅडेमीनें' दिलेल्या विशेष प्रोत्साहनानें देवधरानी हें कार्य अंगिकारलेलें आहे. त्यांचा दौरा यशस्वी व्हावा असें इच्छितों.

### शास्त्रशुद्ध गाणें

या महिन्यांतली मनावर विलक्षण परिणाम करून गेलेली एकमेव अशी गाण्याची बैठक ऐकली ती 'खाँ सा. खादीम हुसेन खाँ यांची आज कीर्तिवंत असलेले बरेचसे गायक आणि गायिका खादीम हुसेन खा. सा. चा शिष्य परिवार आहे एवढें सांगितलें, म्हणजे त्यांच्यासंबंधीं आणखी कांहीं विशेष सांगण्याची गरज नाहीं. अस्ताईची भरतीदार आणि शास्त्रशुद्ध मांडणी कशी करावी, पक्क्या हिशेबाची 'घराणेदार बोलतान' कशी असते, बांधेसुध तनाईत कशी असावी, याचें अत्यंत उत्कृष्ट दर्शन या बैठकींत झालें.

### जयंति कीं ढोंग

'सूरसिंगार संसदेनें' स्वामी हरिदास जयंति निमित्त, "कल के कलाकार" या यांवानें तीन दिवस गायन, वादन, नृत्याचे कार्यक्रम सादर केले. या 'कल के कलाकारांत' हफीज अहमद खाँ, सुरेश हळदणकर, जीतेंद्र अभिषेकी, मोहनतारा अजिंक्य प्रभृति नामवंत कलावंतानीं कुठल्या आमिषानें फुकट भाग घेतला, कळलें नाहीं. जयंतिचा हा कार्यक्रम संसदेनें सादर करतांना स्वार्थ-परमार्थ या दोन्हीं ठिकाणीं पाय ठेवले होते. कार्यक्रमाला तिकिटें होतीं. कार्यक्रमाच्या जाहिरातीनें भरलेल्या पुस्तिका जबऱ्या किंमतीला विकल्या जात होत्या. सर्व कांहीं यथासांग होतें. एकंदर ढोंग पाहून हळुवार असें स्वामी हरिदास धाई धाई रडले असतील याबद्दल शंका नाहीं !

## विनाकारण

### दुसरं काय !

प्रेस क्लब प्रेसिडेंट लॉरेन्स यांनी एक गोष्ट सांगितली, ती अशी : मास्कोमध्यें कम्युनिस्ट पार्टीच्या मेळाव्यांत क्रुश्चेव्हनां एक निनावी प्रश्न विचारला होता, "ज्यावेळीं स्टॅलिन दुष्कृत्यें करीत होता त्यावेळीं आपण काय करीत होता ?" क्रुश्चेव्हनीं प्रश्न वाचतांच पृच्छाकास पुढें यावयास सांगितलें, पण कोणीच पुढें येईना. तेंव्हां क्रुश्चेव्ह म्हणाले, "भाईसाहेब हे पृच्छक आतां जें करीत आहेत तेंच तेव्हां मी करीत होतों !"

—गोपालन्

---

[ पान ३४ वरून चालू ]

झाले होते. 'आंपल्याला जें लिहावयाचें तें लिहिल्याचें समाधान, पण केव्हां केव्हां कांहीं तरी विलक्षण वाटतें.' असें एकदोनदा त्यांनीं म्हटलें.

संध्याकाळीं परत जातांना कांठी टेंकीत हातांतील विजली-टॉर्च चमकावीत फाटकाबाहेर चाललेली त्यांची ठेंगणी मूर्ति अजून डोळ्यांसमोर आहे. त्यांनीं उसन्या गंभीरतेनें परंतु मोठ्या प्रेमानें दिलेलें पानें फाडावयाचें क्लिवरचें पातें स्मृतिचिन्ह म्हणून जपून ठेविलें आहे मी अजून.

नवीन निर्माण केलेल्या वाङ्मय प्रकाराच्या मागें कळसूत्री पात्रांच्या मागें तीक्ष्ण बुद्धि, उत्कट भावना व अनुभवाची प्रखर आंच, अंतःकरणाचा हळुवारपणा असल्याशिवाय असलें जिवंत लेखन होत नाहीं हेंच खरें.

● ● ●







अनुक्रमणिका

REGD. No. B-7640
OCTOBER 1959
DIPAVALI MONTHLY



COVER PRINTED BY SADHANA ART PRINTERS BOMBAY-1

अनुक्रमणिका